**बुधवार आणि नाग पंचमीस । शक अठराशें छत्तीस** ॥ ४६ ॥ **हाच दिन तुझ्या निर्याणाचा । सन्निधीं वास वाग्देव प्रभूंचा । ईश्वरलीला वर्णितां वाचा । तटस्थ होई स्वानुभवें** ॥ ४७ ॥ तव सन्निध मी बसलों असतां । **माते** तुज पुशिले प्रश्न तत्वता । उत्तरें दिधलीं त्वां निववीलें चित्ता । झाली तृप्तता माझे मना ॥४८॥ अत्यंतचि समाधान आहे म्हणुनी । **आई** कथिलें त्वां मजलागुनी । इच्छा किमपीहि नसे मनीं । ऐसें त्वां वचनीं कथिलें मज ॥ ४९ ॥ परत प्रश्न केला मी तुजला । तुझी दुहिता **त्रिवेणी** इजला । आज्ञा तुझी काय कथीं ती मजला । पूर्ण करीन हस्तीं जरि मम घडे ॥ ५० ॥ **तूं तिचा बंधु तुझी ती भगिनी । काय कथूं मी तुजलागुनी । ऐसें वदसी तूं शांत वचनीं** । आणीक वदसी ऐसें तूं ॥ ५१ ॥ **माझ्या निर्याणाच्या वृत्तासी । तव हस्तें लिहूं नको भगिनीसीं** । ऐसें **माते** कथिलें त्वां मजशीं । हेतू तुझा तुज ठावा ॥ ५२ ॥ **अत्यंतचि समाधान आहे म्हणुनी** । हेंही **आई** कथिलें त्वां पुन्हां मजलागुनी । **इच्छा किमपीहि नसे मज मनीं** । ऐसें त्वां वचनीं कथिलें मज ॥ ५३ ॥ प्रश्नोत्तर करितां करितां । मज भासला त्वनिर्याण समय तत्वता । यास्तव ठेवूनि **तव चरणीं** माथा । ममांकीं तव मस्तक ठेविलें ॥ ५४ ॥ तधीं **श्रीकृष्ण गोविंद हरे मुरारे । हे नाथ नारायण वासुदेव हरे** । ह्या तुझ्या नित्यपाठ मंत्रोच्चारें । वदूं लागलें मुख तुझें ॥ ५५ ॥ तुझें निर्याण समीप आलें । ऐसें **श्री देवांसी** मी विदित केलें । **सर्व साक्षी** असतां मज अज्ञत्व आलें । **समर्थ वाग्देवासी** कथावया ॥ ५६ ॥ म्हणे मी **देवा** कृपा करूनी । **मातेला** अवलोका येथ येऊनी । **प्रभु वाग्देव** समीप येऊनी । तव सन्मुख उभे ठेले ॥ ५६ ॥ **शिवहर चंद्रमौळी श्री शंकर । व्याघ्रांबर धारी भोलानाथ दिगंबर । कर्पुर गौर मदन दहनांतक कमळेश्वर** । हेचि ठेले तुजपुढें ॥ ५७ ॥ प्रसंग पाहुनी तुझ्या जवळ । आले **प्रभु वाग्देव** दयाळ । जाहले तुजवरी कृपाळ । भवभ्रम दूर करण्यासी ॥ ५८ ॥ **श्री वाग्देवें** निरखूनी । **माते** अवलोकिलें तुज लागुनी । तूंही **प्रभु वाग्देव** नयनीं । नयन वेधलेस प्रेमभरें ॥ ५९ ॥ तुज मस्तकापासूनि पायातर । हस्त फिरविले लावूनि भंडार । इतुक्यांत पातले चंदगडकर । **हरिभक्त विठ्ठल कामत** ते ॥ ६० ॥ उभयांनीं तव श्लोक गजर केला । त्यांतचि त्वां **पुण्य देह** ठेविला । हेतू तुझा पूर्ण झाला । मनीचा वाढ दिवसाचा ॥ ६१ ॥ आह्मीं गजर केला **हरि** नामाचा ॥ अत्यानंदचि झाला साचा । योगायोग कामत **विठ्ठलाचा** । अनुभव त्याचा तये काळीं ॥ ६२ ॥ तव अतुल निष्ठा **श्री वाग्देव चरणीं** । तुज फळा आली ती निर्वाणीं । **माते तुझा पुण्यवान प्राणी । निःषंक उद्धरुनी गेला तो** ॥ ६३ ॥ **माते** ममांकीं तव मस्तक शोभत । तव वृत्ती उठली मम हृदयांत । तव अस्थि नेउनी **पंढरपुरांत । चंद्रभागेंत** विसर्जाव्या ॥ ६४ ॥ वृत्ती उठे न उठे मम मनीं । तव **समर्थ वाग्देव** वदले मजलागुनी । **थळी माझ्या हृदयांतुनी । वृत्ती ऐशी उठतसे** ॥ ६५ ॥ **कथीन तुज तें जरी ऐकशी । तरी सांगेन मी रे तुजशीं** । कृपा करूनी सांगा मजशीं । वदतां **वाग्देव** कथिती पैं ॥ ६६ ॥ **दग्ध होतां तव मातेचें शरीर । अस्थी घेऊनियां येई माघार । मज नेणें असे त्या तुज घेऊनि बरोबर । चंद्रभागेंत सोडावया** ॥ ६७ ॥ ऐकूनि **प्रभु** मुखींची वाणी ।

संतोष झाला ममांतःकरणीं । अनुभव साक्षित्वाची खाणी । **समर्थ धनी प्रभु देव** ॥६८॥ आज्ञा मस्तकीं वंदूनी । आलों अस्थि सर्वे घेऊनी । परम कृपाळू **भगवान** होउनी । ईछा पूर्ण केली माझी ॥ ६९ ॥ मज परिवारासह संघे घेउनी । गेले **पंढरी क्षेत्रा** लागुनी । स्वयें **चंद्रभागेंत** उभे राहुनी । मज आज्ञापिती तेधवां ॥ ७० ॥ **थळी येई अस्थि घेउनी । निःशंक दे चंद्रभागेंत सोडुनी । मीचि ब्राह्मण समज धर मनीं । ईछा पूर्ण तव झाली** ॥ ७१ ॥ **अंतर्साक्षी वाग्देव भगवान** । परम कृपाळू भक्तां लागुन । राव, रंक ज्यां सम समान । अद्वितीय आगमन **समर्थांचें** ॥ ७२ ॥ **सत्यंतरें स्वानुभव प्रचीती वदे माझी ही त्रिसत्य उक्ती । ऐशी विभूति पृथ्वीवरुती । न भूतो न भविष्यती** ॥ ७३ ॥ अंतपार नलगे तयांचा । अगाध महिमा **प्रभु वाग्देवांचा** । वर्णन करितां थकते वाचा । अनुभव साचा वदतां न ये ॥ ७४ ॥ **भगवंतें** परम कृपा केली । **थळी वंशावळी उद्धरिली । मम कुल कमळेश्वर रूपें मूर्ति पातली । सगुण रूपें ममगृहीं** ॥७५॥ हा जन्म **आई** तुझ्यापासून । यास्तव झालें **गुरु कृष्ण देव** दर्शन त्याच परी सर्वानुभव घेऊन । तृप्त झालों मम **माते** ॥७६॥ जरी तव उदरीं जन्म न येता । तरी कैंची ये ही अनुभव वार्ता । आजि मी या जगावरुता । केवीं असतों **आई** गे ॥ ७७ ॥ यास्तव **माते** तूं प्रथम **ईश्वर** ॥ हाची माझा असे गे निर्धार । तुज वांचूनिया क्षितिवर । दयाघन नसे संसारीं ॥ ७८ ॥ **ईश्वरचि तूं** मानूनि तुजला । अर्पितों ही **श्री संतसंघपुस्तकमाला । माते ईश्वरी तवात्म्याला** । या तृतिय भागें आनंद हो ॥ ७९ ॥ हें जग निर्मित्या **प्रभुराया** । जोडूनि हात पडतों पाया । आणखी गर्भवास कृष्णा या । देशी तरी सुखें देई ॥ ८० ॥ मम **जगन्नाथ** पिता **मथुरा** माता । यांच्याच उदरीं वास दे ताता । याहूनि काय त्रैलोक्य नाथा । मागों आणिक तुजलागीं ॥ ८१ ॥ जरी पुनर्जन्म त्वां मजला दिधला । तरी मी आवडीनें स्मरेन तुजला । पाहें तुझ्या तूं मनाला । **कृष्ण विश्वास** धरुनी असे ॥८२॥ समस्त **मातृ पुत्रांसी** मी नमन । करीत असें मनों भावें करून । सदैव करा **माता पितयांचें** ध्यान वंदन । प्रत्यक्ष **ईश्वर** मानुनी ॥८३॥ धरा तुम्ही येथ इमान । कदापि नका होऊं बेइमान । दुखऊं नका त्यां अंतर सुजन । कर्तव्य पराङ्मुख होऊनियां ॥ ८४ ॥ घेतां तयांचा प्रेमाशिर्वाद । होईल हित लाभेल आनंद । जन्मवरी तुम्हांसी सनद मिळेल सत्यानंदाची ॥ ८५ ॥ '**नमातुः परदैवतं**' ही वचनोक्ती । मिथ्या न होय ती कल्पांतीं । मनी विवरितां विचारांति । न्यायेचि निवाडा तत्काळ ॥ ८६ ॥ यास्तव **मातृ, पित्र** द्रोह स्वार्था कारणें । प्राण गेला तरी ही न करणें । या कर्तव्या माजी करितां उणें । मग नृजन्म जिणें वदतां नये ॥ ८६ ॥ जरी माझें बोलणें कोणाही **मातृ** नंदना । किमपीहि न रुचलें तयांच्या मना । तरी मज क्षमा असावी तयां पासून । साष्टांग नमन तयां माझें ॥ ८७ ॥ **समर्थ श्रीगुरु कृष्ण बांदकर तत्पदांबुजी माझा नमस्कार । वदते वदविते श्रीगुरुवर । वृत्त कृष्णार्पण असो हें** ॥ ८८ ॥

अनुष्टुप—**नो माझें लिहिणें नाहीं दयाळा कृष्ण सद्गुरु ।**
**वदता वदवीता तूं दास हा तव किंकरु ॥**

नम्र पुत्र

**कृष्ण जगन्नाथ थळी.**

॥ श्रीरामसमर्थ ॥

## ॥ श्रीमद्सद्गुरु समर्थ कृष्ण महाराज बांदकर पादारविंदेभ्योनमः ॥



पद—( ज्या ज्या वेळा ज ज होइल, या चा० )

अनंतकोटी ब्रह्मांडाचे नायक श्रीकृष्ण । सगुणरुपानें प्रगटुनि दासां दावियलें चरण ॥ ध्रु० ॥ सार्वभौम श्री स्थिरचर व्यापक साक्षात् रघुनंदन । सर्वसाक्षि सर्वांतर्यामी निखिल निरंजन । निराकार निर्विकार सच्चित्सौख्य-करांत्र घन । अवतरले जडमूढांसाठीं रूप धरुनि सगुण ॥ अ० ॥ १ ॥ कृपा-कटाक्षं रामकृपेचें भरिलें नेत्रांजन । ज्ञानदीप प्रज्वलीत करुनी जाळियलें मीपण । चित्स्वरुपाचा मार्ग दाउनी मार्गि लाविलें जन । टळवियलें हो अज्ञ जनांचें पुनर्जन्म मरण ॥ अ० ॥ २ ॥ धरिला हा अवतार प्रभूनीं निःसंषय जाण । दावियला पथ अतिसुगमाचा दुस्तर भवतरण । नामें प्रगटुनि मही-वरी या बांदकर कृष्ण । कृष्ण बालका पदीं मुरविला होउनि स्वयें आपण ॥ ३ ॥

---

ऐसे उदार सद्गुरु । कल्पनातीत अगोचरु । मत्हृदयागारीं प्रगटोनि थोरु । आनंद सागरीं डुबविला ॥ १ ॥ मातें दिधलें स्वानंद साम्राज्य । पाजूनि निजकृपेचें आज्य । ऐसे करुणासागर सद्गुरुराज । नमन सर्वदा तत्पदा ॥ २ ॥ शके अठराशें चोविस । आषाढ शुक्ल गुरु पंचमीस । गोमांतक प्रांतीं अचलो ग्रामास । श्रीसद्गुरुपद जोड लाभली ॥ ३ ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

**धोपेश्वरीं अवतरे रघुनाथरूप । जें ब्रह्म निर्गुण पुरें सगुण स्वरूप ॥**
**वाग्देव रुद्रनुत जें भवसिंधुपोत । वंदी तदंध्रि रजतत् गुणकीर्तिगात ॥ १ ॥**



**श्री रघुनाथ महाराज,** धोपेश्वर ( गत ) **श्रीवाग्देव महाराज,** मुंबई, (विद्यमान)

**पद--देवा, रघुनाथा ताता ममप्रिय हृदयस्था ॥ ध्रु० ॥ मी दुर्बळ तवदास पाहुनी आणियलें चित्ता ॥ १ ॥ येउनियां ममगृहीं तुह्मी हो, भेट दिली अनाथां ॥ २ ॥ हरिहरसम निजदर्शन देउनी, दूरविली मच्चिंता ॥३॥ कळकळ इतुकी धरिली प्रभु हो विसरूं केविं आतां ॥ ४ ॥ पाहुनियां तवलीलानूभव निवलों गुणवंता ॥५॥ कृष्ण सद्गुरू कृपानुभव हा कृष्णजगन्नाथा ॥६॥**

---

शके १८२८ फा. व. १४ बुधवार रोजीं **श्री समर्थ वाग्देवमहाराजांनीं** माझ्या उत्कट इच्छेनुसार मला अनुभव प्रचीति देण्याकरितांच **श्री समर्थ रघुनाथमहाराजानां** मुंबई, गिरगांवरी गल्लींतील माझ्या बिऱ्हाडीं आणिलें. त्यावेळीं उभयतांची पुजा करून नंतर संध्याकाळीं सहा वाजतां वरील फोटो स्वहस्तें घेतला आहे.

## ॥ श्रीरामसमर्थ ॥

प्रिय वाचक **बंधु भगिनी** हो ! परम पूज्य **माता पित्याच्या** पूर्वपुण्याईनें व या देहाच्या पूर्वकर्मविपाकान्वयें महाअनुभवसूर्य धनगरकुलोत्पन्न **श्रीसमर्थ वाग्देवमहाराजांच्या** पददर्शनाचा लाभ शके १८२४ पासून आज मिति शके १८४१ पर्यंत होत आला आहे ! व तो **समर्थांनीं** मज गरीब पामरावर परम कृपाकरून अनेक अपराध पदरांत घेऊन दिला आहे. इतक्या १८ वर्षांच्या दरम्यान जो कांहीं त्यांजपासून मला अर्थ प्राप्त झाला, त्याची होतां होईल तितकी एकंदर माहिति सत्यत्वें करून व स्पष्टपणें **पुस्तकरूपानेंच** प्रसिद्ध करून माझ्या अत्यंत प्रेमळ मालेच्या आश्रयदात्यांस प्रेमपूर्वक अर्पण करण्याची प्रेरणा होत आहे ! इच्छा पूर्ण करणार तेच **श्रीपद समर्थ** आहेत. तत्पूर्वी **श्रीसमर्थ रघुनाथमहाराज** ( गत ) उर्फ **काका पुराणिक**, धोपेश्वरकर यांचें व **श्रीसमर्थ वाग्देव महाराज** यांचें ऐक्य व **श्रीसमर्थ वाग्देव महाराजांच्या** अधिकाराबद्दल प्रसंग विशेषीं **श्रीसमर्थ रघुनाथमहाराज** यांच्या मुखांतून [ सर्व भक्त मंडळीस समजण्याकरितांच ] स्रवत असलेलें **अमोल बोधामृत,श्रीसमर्थ वाग्देव महाराजांचे** मुंबईतील परम भक्त कै. ह. भ. प. **दत्तात्रय कृष्ण सांडू** यांनीं आपल्या त्या वेळच्या अनुभवांवरून ( ४६५ पृष्ठांच्या चोपडींत ) लिहून ठेवलेले प्रेमपरिप्लुत स्वयंस्फूर्ति प्रेमोद्गार त्यां पैकीं कांहीं उत्तारे पुढें दिले आहेत, ते वाचक बंधूंनीं अवश्य वाचावेत, प्रिय वाचक हो संतांची लिला अगाध आहे ! त्यांच्या लिलेचा अंत संसारी मनुष्यांस निश्चयेंकरून कदापि लागणार नाहींच नाहीं ! !

---

## कै. ह. भ. प. दत्तात्रय कृष्ण सांडू यांच्या हस्तलिखित चोपडीवरून खास उतारे.

( कै. ह. भ. प. दत्तात्रय कृष्ण सांडू यांस श्रीरघुनाथमहाराजांच्या दर्शनास जाण्यास अडचणी येऊं लागल्या त्यावेळचे त्यांचे अनुभवोद्गार. )

" **संतांची** भेट होण्याकरितां सर्व प्रकारें सर्व तयारी असूनच उपयोग नाहीं, पूर्वसुकृताची जोडी असेल तरच भेट होईल. रजा घेऊन कोकणांत जावें, येतानां **समर्थांचें** दर्शन घ्यावें, असा संकेत करावा तो कांहीं तरी कारणानें सुटी संपावी, बोट वेळेवर मिळूं नये, आजारी पडावें अथवा रजाच मिळू नये, जवळ पैसाच नसवा, आयत्या वेळीं निघतानां घरांत आजारीच पडावें, स्नेही सोबती ह्यांस भेटण्यांत वेळ जावा बाकीचीं सर्व सुत्रें देव घेव भेटी वगैरे व्हाव्या, रहावयाचें काय तर **समर्थांची** भेट होणें. आतां एवढें खरें कीं, **समर्थांची** भेट घेण्याचा मनानें पूर्ण निदिध्यास घेतला तर मग सुकृताची जशी मर्जी असेल त्या मानानें वर्षे, महिने, दिवस ह्या कालांतरानें भेट होते. समर्थ ह्मणतात "**मग त्यांस खेंचित आणतो**".

( श्रीयुत नेने शास्त्री हे श्री वाग्देव महाराजांची आज्ञा घेऊन श्री रघुनाथ महाराजांकडे जाणार होते त्यावेळीं. )

*"**देवां**ची स्वारी शास्त्रीबुवांकडे गेली होती. **देवांची** आज्ञा घेऊन व दर्शन घेऊन **समर्थां**कडे जावें ह्मणून शास्त्रीबुवा २।३ वेळां **देवां**कडे गेले होते. परंतु त्या वेळीं हिरण्यकशिपू मारल्यावर **नारसिंहानें** जसें उग्रस्वरूप धारण केलें होतें, त्याप्रमाणें **श्रीवाग्देवांनीं** वृत्ती धारण केली होती. ह्यामुळें शास्त्रीबुवांस मनाप्रमाणें दर्शन झालेलें नाहीं. शास्त्रीबुवांसारख्यांची इच्छा अपुरी कशी करणार **श्रीवाग्देव** यांच्या बिऱ्हाडीं दर्शन देण्यास गेले होते. **श्री वाग्देवानीं** सांगितल्याप्रमाणें शास्त्रीबुवांस **समर्थांचें** यथेच्छ दर्शन झालें. इतकेंच नव्हे तर सद्गुरु मुखें '**तत्वमसि**' या महावाक्याचा अर्थ श्रवण करावा असें त्यांच्या मनांत होतें, तें कार्यही शास्त्रीबुवाचें सहज झालें. "**हा प्रभाव श्रीवाग्देव दर्शनाचा होय.**"

( श्रीसमर्थ रघुनाथ महाराज यांनीं कै० ह. भ. प. दत्तात्रय कृष्ण सांडू यांस आपलेकडे बोलाविलें त्यावेळीं. )

**देवां**च्या दर्शनास गेलों तेव्हां "मला तिकडे बोलाविलें आहे" असें मी ह्मटलें. "**ह्मातान्या रघुनाथानें काय ?**" असें **देवानें** विचारिल्यावर मी होय ह्मटलें. त्या वेळीं षड्ग्रहींचें माहात्म्य व त्याप्रीत्यर्थ येथें जिकडे तिकडे धामधूम चालली होती. त्या संबंधानें कांहीं बोलणें झालें. "**काय शास्तर काढतोस, कसली पीडा घेऊन बसलास**" असें **देव** बोलले व '**रघुनाथाला पत्र लिव**' ह्मणून सांगितलें. मी ह्मटलें आपणच कसें तें सांगा. **समर्थांनां** मी कसें पत्र लिहावें ? त्यावेळीं **देवानीं** पत्र लिहविलें तें:—

मि. कार्तिक शु० २ शके १८२१ रविवार.

"**श्रीसमर्थ वाग्देव महाराज याचे श्रीसमर्थ रघुनाथास आशिर्वाद. पुनव बिनवेचें कांहीं शास्तर काढूं नका. माणसाचें हाडम आहे, दुकानचें माणूस दुकानाला लावून द्यावें. ह-या** ( श्रीयुत हरी कृष्ण सांडू ) **पोंचला दुकानाला ह्मणजे दत्तोपंत** ( के०दत्तात्रय कृष्ण सांडू ) **तुझ्या पायावर यावयाचा**" हें पत्र जातांच हरी यास मुंबईस जाण्याची आज्ञा झाली. "**वाग्देव जर रक्षण करीन ह्मणतात तर मग आमचें काय गेलें खुशाल जा.**" असे × सूर्याजीबोवाचें बोलणें झालें.

( श्रीयुत सांडू यांच्या घरीं महा भयंकर दुखणें झालें त्यावेळचे श्रीरघुनाथमहाराजांस पत्रांत लिहिलेले उद्गार ! )

**श्री वाग्देव** हीं त्या प्रसंगीं माझ्या दुर्दैवाने वाडींत वारीलाही (भिक्षेला) येत नाहींसे झाले, त्यास कारण त्या प्रसंगीं आमच्या सर्वांच्या बुद्धीनें सर्वस्वीं परवलंबन केलें असल्यामुळें

---

* श्रीसमर्थ वाग्देव महाराजानां 'देव' या नांवानें भक्तमंडळी बोलतात. × श्री सूर्याजीबुवा हे संत श्रीरघुनाथ महाराजांच्या गांवचे होते. [ श्रीसंतसंघ पुस्तकमाला भाग १ पृष्ठ २७ वरील संत. ]

**श्रीवाग्देवां**विषयीं मन संकल्प विकल्पात्मक झालें होतें !! त्यावेळीं **समर्थां**कडून ( श्री रघुनाथ महाराजांकडून ) असें लिहून आलें. "**श्रीवाग्देव येत नाहींत हेंच संकट. हें पत्र पोंचेल त्यावेळीं श्रीवाग्देव येतील व दर्शन देतील. ईश्वराचें नांव स्मरण करीत असावें, अंगारा पाठविला आहे.**" असें पत्रानें व तारेनें कळविलें. त्यांत '**भिऊं नका**' असा आशीर्वादहि होता. वर लिहिलेलें पत्र पोष्टाचा शिपाई घेऊन आला त्याचवेळीं **श्री वाग्देव** आले. पत्रांत **वाग्देवांच्या** भेटीचा मजकूर आणि तसा प्रत्यक्ष अनुभव ह्यामुळें मंडळीस किती धीर आला असेल हें सांगावयास नको. "**अमृत परम रुग्णा वांचवायास आलें.**" असें नुसतें वाटलें नव्हे तर **श्री वाग्देव** यांनीं **स्वहस्तें तीन दिवस प्रातःकाळीं येऊन अमृत पाक तयार करून मांसाच्या गोळया प्रमाणें पडलेल्या आपल्या पिलांस आई जशी चोचीनें चारा भरिते त्याप्रमाणें तो अमृत पाक मला पाजून जीवदान दिलें. साहा शास्त्रें, अठरा पुराणें, चार वेद, यांस देखील ज्यांचें वर्णन व्हावयाचें नाहीं त्या श्रीमान् भगवान् वाग्देवांनीं माझ्या सारख्या पामराला अमृत पाजावें हा माझ्या पुण्याचा पराक्रम नव्हे हा सर्व प्रताप गुरु कृपेचा.**

लेखक—**आनंदराव आ. त्रिलोकेकर.**

ता. २३--२--१९००

---

( धोपेश्वर येथें श्री रघुनाथमहाराज यांस भक्तमंडळीनें केलेले प्रश्न. )

आह्मीः—**श्री वाग्देव** वारंवार ह्या पायांची स्तुती करीत असतात.

**समर्थः—सुधी जो आहे तो अंतःकरणेंकरून सर्वत्र साधु मानितो. ज्याला हृदयस्थ दिसला तो साधु हृदयस्थ दिसणें त्यांत सुद्धां भेद आहे, ज्याला तत्व ह्मणून समजलें असा एकादा.**

आह्मीः--या ठिकाणीं हा सर्व प्रकार लागू पडतो.

**समर्थः—कुठें पाहिजे तिथे लागू पडेल. पण मुळीं तें अतर्क्य आहे. 'अतर्क्यासि तर्की असा कोण आहे.' असें रामदास ह्मणतात.**

आह्मीः—**वाग्देव** ह्मणतात--**रघुनाथाचें गुमान कोणास सांपडावयाचें नाहीं.** तसेंच **वाग्देवांना** इकडून पत्र गेलें होतें, त्यांत "**श्रीमान भगवान् वाग्देव**" असें लिहिलें होतें.

**समर्थः--श्रीमान हें पद जें आहे तें ईश्वर भलत्याला देत नाहीं, तसेच असतात त्यांना देतो.**

आह्मीः--**श्रीवाग्देव** ह्मणतात—**आपल्या वांचून जगांत कांहीं नाहीं, धोपेश्वरींच्या घांटाला रघुनाथ बसला आहे.**

**समर्थः--खरें आहे, कारण स्मरारि जो श्रीधूतपापेश्वर त्याच्या हृद्यामध्यें रघुनाथ शोभतो आहे.**

आह्मीः--**देवांनीं** आपलेंच वर्णन केलें आहे.

**समर्थः--तुह्मीं पाहिजे तर तसें समजा.**

आह्मी--**वाग्देव** ही असेंच ह्मणतात.

**समर्थः--त्यांस भूत, भविष्य, वर्तमान समजतें.**

आह्मीः--**वाग्देव** ह्मणतात, **जग झालें आंधळें, जगाचे फुटले डोळे.**

**समर्थः--अहल्येनें असेंच ह्मटलें आहे, अरे हा आत्माराम सर्वांच्या हृदयांत असून एकादाही समजत नाहीं कीं, माझ्या हृदयांत आहे.**

आह्मी--:**वाग्देव ह्मणतात, रघुनाथ प्रत्यक्ष ईश्वर आहे.**

**समर्थः--दासांत व ईश्वरांत भेद नाहीं, तोच रामदास. अनुभव येतो त्यानें ईश्वर ह्मणावें. ईश्वर ज्यानां प्रत्यक्ष दिसला, प्रत्यक्ष ज्या वेळेस दिसेल त्या वेळेस अनुभव ह्मणावा. सर्व विषय आपोआप सुटले पाहिजेत नाहीं तर कडकडीत उपोषण केल्यानें विषय माघारे फिरतात, पण आशा कोठें मागें फिरत आहे. तो आशेच्या पलीकडे आहे, तो ह्याच्या दृष्टीस पडला ह्मणजे सर्व विषय नाहींसे होतात. षड्गुणैश्वर्य जें आहे तें आत्म्याचें स्वरूप आहे. तें ज्याणें पाहिजे त्याणें जिंकिलें, पण मी बोकांडी बसतो अमुक द्या तमुक द्या ह्मणण्याला ईश्वर बसला आहे काय ?**

आह्मीः--ह्याच रूपानें मुंबईस दर्शन होतें.

**समर्थ--ईश्वर माझीं रूपें घेऊन अन्न घेतो दुसरें काय ?**

---

# श्रीसमर्थ वाग्देवमहाराज व श्रीसमर्थ रघुनाथमहाराज यांचें ऐक्य.

प्रातर्विधी होऊन स्वारी ( **श्रीरघुनाथ महाराज** ) ओटीवर बसली, तेव्हां **श्रीवाग्देव** यांचें आलेलें पत्र वाचून दाखविलें, ) श्रीसमर्थांस वाचून दाखविलें तेव्हां तें येथें दिलें असतां अप्रासंगिक होणार नाहीं ह्मणून तें तसेंच येथें लिहितों. )

**श्रीवाग्देव** यांजकडून आलेलें पत्र--१३-१२-९९.

( मुंबईतील प्रसिद्ध नांगर तेलवाले कै० शंकर रंगोबा वगैरे भक्त मंडळी धोपेश्वरीं गेली त्यावेळीं. )

**"शंकरराव तुळशीच्या झाडाखालीं तुला गोष्ट सांगितली ती खरी तूं आपली पूजा ( श्रीरघुनाथ महाराजांची पाद्यपूजा ) झाल्याबरोबर इकडे निघून ये, अशी श्रीसमर्थ वाग्देवाची तुला आज्ञा आहे. पूजा झाली कीं,**

**सांडूच्या माणसांनींही घरीं यावें. रघुनाथ महाराज धोपेश्वराच्या घाटालाच आहे असें नाहीं. भक्तीच्या भावार्थानें हृदयांत आहे. श्रीगुरुभक्ती असली ह्मणजे संगें आहे. सांडूचीं पोरें शंकरराव तूं घरीं आण; नेलेलीं सर्व माणसें बरोबर घेऊन ये."** हें पत्र ऐकून **समर्थ** ह्मणाले:–**"यावरून तुह्मांला घरीं रहाण्यास महिनाभर अवकाश नाहीं, आतां शंकरराव गेलेच. तेव्हां शंकररावांबरोबर निघणें ह्मणजे गर्दी करून जाणें हेंच निघणें होय. ईश्वराच्या इच्छेप्रमाणें व्हावयाचें सर्व"**

**श्री वाग्देव** यांच्या पत्रांतील अर्थ आह्मीं सर्वांनीं ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. पत्रांत "**पूजा झाल्याबरोबर**" इकडे निघून ये असें आहे, हें पत्र मुंबई ता. १३-१२-९९ चें आहे आणि शंकरराव ता. १४-१२-९९ रोजींच तेथून निघाले, शंकरजीच्या जाण्याबद्दल विचारिलें होतें, त्यावेळीं "**आतांच काय पाहूं मग**" असें **समर्थ** बोलले.

ता. १४ रोजीं पूजेची सांगता जो नैवेद्य तो झाला, सर्वांचीं जेवणें झालीं, नंतर **श्रींची स्वारी** पोथी वाचावयास बसली. त्याबरोबर आह्मीं सर्वांनीं पायावर मस्तक ठेविलें तसें शंकररावानींही ठेविलें, शंकरराव मस्तक ठेऊन उठतात, इतक्यांत त्यांच्या तोंडाकडे पाहून समर्थ ह्मणाले:—**आजच निघावयाचें करा** ह्मणजे जेवण झाल्यावर बसूंसुद्धां दिलें नाहीं. पूजा होतांच ही जी **श्रीसमर्थ वाग्देवांची** ता. १३ ची आज्ञा तीच आज्ञा पूजेची सांगता होतांच **श्रीं**कडून झाली. त्यानंतर ह्मणजे ता. १६ रोजीं पत्र पोंचून ती आज्ञा वाचली गेली, "**रघुनाथ ह्मणून पायापड हे रघुनाथाचेच पाय आहेत असें श्री वाग्देव ऐक्य सांगतात त्याचाच हा अनुभव होय.**

नंतर आमच्या (मुंबईत श्रींयुत सांडूच्या घरीं) घरीं येणें संबंधानें निघालें तेव्हां **समर्थ** ह्मणाले "**१५ सोडून २० दिवस सुद्धां राहीन" पण पोरीचें लचांड आहे ना? तिच्या अंगावर भूत आहे.** मी ह्मणालों, नुसत्या अंगाऱ्यानें भूतें जातात असा अनुभव आहे. "**भूतें जातात खरीं पण हें आमचेंकडील जात नाहीं ना**"? असें त्यावर **समर्थ** ह्मणाले, **समर्थांच्या** मुलीच्या अंगावर पिशाच्च आहे, तें **समर्थ** नसले ह्मणजे अंगावर येतें, यामुळें ती घरींच असते. लोकांचीं भूतें, संबंध, ब्रह्मराक्षस, प्रत्यक्ष काळ सुद्धां समर्थांच्या नामस्मरणानें भिऊन जातात पण घरांत ही स्थिति! **सुर्याजीबुवा** तसेच **श्रीभगवान् वाग्देव** ह्मणतात **पांघरूण घेऊन बसला आहे.** या पांघरुणाच्याच भागांपैकीं, हा एक भाग. घरांतलीं भूतें जात नाहींत तीं दुसऱ्यांचीं भूतें काढतो कसला ह्मातारा, असें घरांतील माणसांनीं किंवा लोकांनीं कां ह्मणूं नये? अशा प्रकारच्या आणखी पांघरुणामुळे आसपासच्या चांगल्या चांगल्या समजदार लोकांतही "**जगाचे फुटले डोळे जग झालें आंधळें ह्या श्रीवाग्देवांच्या** ह्मणण्याचा अनुभव येतो.

( श्री**समर्थवाग्देव** महाराज यांच्या आज्ञेवरून श्रीयुत सांडू यांनीं केलेली श्री**समर्थ रघुनाथ**महाराजांची पायपूजा )

"रविवारीं मार्गशीर्ष कृष्ण शके १८२१ ता० ३०–१२–९९ रोजीं **श्रीवाग्देव** यांनीं सांगितल्याप्रमाणें सौभाग्यवतीसह मी आणि वासुदेव मिळून ( कै० दत्तात्रय सांडू व विद्यमान श्रीयुत वासुदेवराव सांडू ) **श्रीच्या चरणाची पूजा केली, श्रीवाग्देव** यांनीं ता० ६–१२–९९ रोजीं **समर्थांची पूजा तांब्या, पितळी, काठी, घोंगडी पांढरी, सवा रुपया, पुरणाचा नैवेद्य, खुरचाफ्यांचीं फुलें या साहित्यानें करावी असें सांगितलें** तें सर्व तयार होतें माजघरामध्यें मध्यभागीं एक मोठ्या

चबरंगावर पीतांबर घालून त्यावर चाफ्यांची फुलें मनोहर प्रकारानीं दाट मांडिलीं होतीं. दोन बाजूस पंचवातीच्या उंच समया लावल्या. उदबत्तीचीं दोन झाडें भरपूर उदबत्या लावून ठेविलीं. एक पंचामृताचें ताट आणि फुलें गंध इत्यादि पूजेचें एक ताट, एका वाटीनें नैवेद्याकरितां तयार केलेली बदामाची क्षीर, नारळ, ऊद, कापूर, सुगंधी तेलें व विडा, पाणी, नेहमीं खातात त्याप्रमाणें त्रयोदशी गुणी कुटून तयार केलेला दुसरा विडा व वस्त्र आणि **श्रीवाग्देव यांनीं** सांगितल्याप्रमाणें सर्व सामान व **त्र्यंबकराव** धामणकर ( मुंबईतील प्रस्तुतचे वैद्य ) यांनीं मोठ्या प्रेमानें तयार केलेला चाफ्यांच्या फुलांचा भव्य हार इतकी तयारी झाल्यावर **श्री** जवळ मी गेलों तेव्हां **"काय झालें तुमचें ? कुठें बसायाचें ?** असें **समर्थ** बोलले तेव्हां जवळच तयार असलेलें पुष्पासन दाखविलें तें पाहून **समर्थ** ह्मणाले **"मी काय यावर बसावयाचें ? कशाला हें बंड, काय हा खटाटोप"** त्यावर मी ह्मटलें **देवांनीं** जसें सांगितलें तसें केलें आहे. तें एकून **समर्थ** ह्मणाले **"मग आमचें कांहीं बोलणें नाहीं. त्या जबरदस्तापुढें आमचें काय चालणार" त्यांनीं जसें सांगितलें तसें करा."**

( **श्रीसमर्थवाग्देव** महाराजांनीं गाण्यांत आपलें व **श्रीसमर्थरघुनाथ** महाराजांचें केलेलें वर्णन. )

"**श्रीदेवांचें** गाणें वाचून दाखविलें तें येथील मंडळीस माहित आहेच, त्यांमध्यें **समर्थ मारुतीचे अवतार आहेत** वगैरे वर्णन आहे व शेवटीं आपलें वर्णन केलें आहे. तें गाणें ऐकून **समर्थ** ह्मणाले **"तुह्मांला झांपड लावली वाग्देवानें सगळें तें आपलें स्वरूप वर्णिलें आणि मजवर घातलें. वरचें वर्णन कोणाचें असा संशय येईल ह्मणून आपलें वर्णन खालीं केलें. सर्वव्यापक भगवान् आहे"** मी ह्मणालों त्या **वाग्देव भगवानानें** आपलें थोरपण **आपण ईश्वर** असें आह्मांस सांगितलें. त्यावर **समर्थ** ह्मणाले—**"ईश्वरानें मनांत आणलें तर अर्जुना सारख्याला तुह्मीं दाद देणार नाहींत"** मी ह्मणालों आह्मांवर नाना प्रकारचीं संकटें आलीं प्लेगच्या वेळीं भयंकर प्रसंग आले, त्यांतून रक्षण करण्यास दुसरा कोणी समर्थ झाला नाहीं. ह्या पायानींच संरक्षण केलें. त्यावर **समर्थ** ह्मणाले **"संरक्षण कोणी केलें ही शंका कां ? त्रैलोक्याचें संरक्षण कोण करितो ? मरतें असें कोण ?"**

ह० भ० प० कै० **दत्तात्रय कृष्ण सांडू** हे श्रीसमर्थ **वाग्देव** महाराजांचे **एकनिष्ठ भक्त** होते, हे मुंबईत जाहिर आहेच. त्यांच्या प्रेमास सीमाच नव्हती ह्मटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांनीं **श्रीसमर्थ वाग्देव महाराजांचें** पदरूपानें वर्णन केलें आहे, तें त्यांच्या भक्तिप्रेमाची साक्ष देत आहे. तें पद—

पद.

**महालसा भंडारी गळ्यामधीं घोळ कोठंबा करीं । पटकुर शिरिं पगडी धनगरी ॥ ध्रु० ॥ वाच्या कोणी वाग्देव कीं 'देव' हि ह्मणती भले । जयातें मोक्ष मार्ग लाधले ॥ भिक्षावारी साठीं दारीं घंटा वाजवी फिरे । जयाच्या दर्शनें पालक सरे । उभा राहि नच कोठें दृष्टी नासिकाग्रि गुणगुणे । भाविकां न दिसति सद्गुण उणे ॥ चाल ॥ वेडा शहाणा चतुर शास्त्रि पंडित । वैराग्य लोभ संसारगुणें मंडित । औदार्य बुद्धि कंजूषपणा दावित । अशा वर्तनें मनुज संशयीं पडे कोण हा तरी । चुकवि जो दत्तमरण कर्तरी ॥ म० ॥ १ ॥**

प्रिय वाचक बंधु भगिनी हो ! प्रभूची इच्छा अकल्पित आहे. **श्रीसंतसंघ पुस्तकमालेंत** प्रसिद्ध होणें करितांच कीं काय कै. ह. भ. प. **दत्तात्रयपंत सांड्** या सद्भक्तास बुद्धि प्रेरणा करून ही लीला लिहवून ठेविली असें प्रेमातिरेकानें ह्मणावें लागतें. येथें त्यांतील कांहीं उतारे देण्याचा सुयोग आल्याबद्दल **श्रीसमर्थ वाग्देव महाराजांचे प्रियभक्त** कै. ह. भ. प. **दत्तात्रय कृष्ण सांडू** यांचे मी अत्यंत आभार मानित आहें.

नम्र बंधु,

**कृ. ज. थळी.**

**पद**—चाल, धांव पाव सांवळे.

श्रीवाग्देवा घ्या मम सेवा सदय हृदय होउनी । अनंत मी अपराधी देवा मज घ्या संभाळुनी ॥ ध्रु० ॥ मम कुल उद्धारायास्तव तूं आलां मम भुवनीं । घेउनि पदरीं रक्षियलें मज भवभय वणव्यातुनीं ॥ क्षण क्षण तर्क वितर्क वृत्ती उठती हृदयांतुनीं । सावध सावध सावध करिसी निजखुण मज पटवुनी ॥ श्री० ॥ १ ॥ अंतर्साक्षीत्वाचा अनुभव प्रचितीं दे आणुनी । थक्क होय मती गति खुंटुनि ये स्वानंदचि उसळुनी ॥ त्या स्वानंदा वर्णाया मुख लाजे हो अनुदिनीं । हृदय संपुटीं न्याहाळीं तुज धन्य धन्य मानुनी ॥ श्री० ॥ २ ॥ सगुणरूप धरुनी तूं प्रभु हो संचरसी जनीं वनीं । कितीकांचा उद्धार करुनि किति जागविसी क्षणक्षणीं ॥ तव गुण महिमा वर्णन करण्या पामर कृष्णचि जनीं । अनंत कोटी ब्रह्मांड नायक अससी तूं ह्मणुनी ॥ श्री० ॥ ३ ॥

## श्रीसमर्थ वाग्देव महाराजांचीं अष्टकें.

**वाग्देव वाग्देव** वदतां मुखानें । पापौघ सारा हरे निश्चयानें ।
गळे अहंकार आणि ती असूया । **भजे रे मना श्री वाग्देव पाया** ॥ १ ॥
कामासि क्रोधासि नसेचि थार । लोभावि मोहा न हृदीं अधार ।
मदा मत्सरा न स्थळ तें वसाया । **भजे रे मना श्री वाग्देव पाया** ॥ २ ॥
विकल्प कुतर्क जळोनि जाय । प्रचीत येतां मति शुद्ध होय ।
घे मानवा तूं स्वानूभवा या । **भजे रे मना श्री वाग्देव पाया** ॥ ३ ॥
विश्वास खासा धरिसी मनातें । स्वानूभवें प्रत्यय येल तूतें ॥
मग तूं पहासी तनु उद्धराया । **भजे रे मना श्री वाग्देव पाया** ॥ ४ ॥
वंदोत निंदोत तुज लोक सारे । परि तूं न सोडीं दृढनिश्चयारे ।
ऐशा गृहा तूं धरिं रे मना या । **भजे रे मना श्री वाग्देव पाया** ॥ ५ ॥
ऐशी तनु दुर्लभ प्राप्त झाली । त्या माजि वाग्देव जननी मिळाली ॥
आतां न जाईल नृ जन्म वाया । **भजे रे मना श्री वाग्देव पाया** ॥ ६ ॥
अनंत कोटी ब्रह्मांडनाथ । आली सख्या स्वानुभवें प्रचीत ॥
वाग्देव आई पदीं देइ ठाया । **भजे रे मना श्री वाग्देव पाया** ॥ ७ ॥
दीनाहुनि दीन असें दयाळा । संभाळ बापा मज तूं कृपाळा ।
ऐसा असे कृष्ण तुझा जनीं या । **भजे रे मना श्रीवाग्देव पाया** ॥ ८ ॥

## पादुकाष्टक.

जोडोनि पाणी विनवीत देवा । त्या पादुकांची मज व्हावि सेवा ॥
हे हस्त नांदोत प्रभु पाद ठाया । **पुरवा मनीषा वाग्देवराया** ॥ १ ॥
तुह्मी कृपावंत करुणानिधी हो । हा भाव माझ्या हृदयांत राहो ।
विकल्प येथें सहसा न द्या या । **पुरवा मनीषा वाग्देव राया** ॥ २ ॥
दिन दीन वाढो तव पादभक्ती । सदैव राहो मनिं ही आसक्ती ॥
हा ध्यास देवा जडवा मना या । **पुरवा मनीषा वाग्देव राया** ॥ ३ ॥
मम काम धामीं आठवोनि नाम । हृदयीं विकासो तव पूर्ण प्रेम ॥
हा प्रेम माझा न कराचि वाया । **पुरवा मनीषा वाग्देवराया** ॥ ४ ॥
त्वन्नाभि मन्मानस नित्य जागो । भ्रमरा परी हा मम देह वागो ॥
न हो पतंगा परि जन्म वाया । **पुरवा मनीषा वाग्देव राया** ॥ ५ ॥
ऐशा परी हो मम जन्म सत्य । ही आस माझी न कराचि मिथ्य ॥
करा पात्र मातें स्वरूपीं मुराया । **पुरवा मनीषा वाग्देव राया** ॥ ६ ॥
होतां तुझी पूर्ण कृपा समर्था । दया क्षमा शांति कळेल अर्था ॥
मुरेल माझें मन कृष्ण ठाया । **पुरवा मनीषा वाग्देव राया** ॥ ७ ॥

---

( हें अष्टक सावंतवाडी येथील वकील, सरदार श्रीयुत पांडुरंग बाळकृष्ण दडकर यांस सन १९११ सालांत घरीं जातेवेळीं आगबोटींत समर्थांचा स्वप्नदृष्टांत झाला त्या वेळीं बोटींतच रचलें, व घरीं जातांच छापून प्रसिद्ध केलें आहे. )

श्रीकृष्ण पार्थाप्रति बोलिजेला । "मी जन्म घेतों जनतारणाला."
जन्मे परात्मा; करि धन्य भूमी । **वाग्देवपादांबुज वंदितों मीं.** १
गंभीर मुद्रा ! कधिं बालचर्या ! निर्गम्य लीला तव साधुवर्या !
मायाभ्रमानें चुकलों स्वधर्मी. **वाग्देवपादांबुज वंदितों मीं.** २
निंदा स्तुती ज्यास सदा समान. सक्रोध नेत्रांस गमे कधीं न.
तल्लीन जो विठ्ठलपुण्यनामीं. **वाग्देवपादांबुज वंदितों मीं.** ३
द्रव्यास मातीसम मानुनीयां. तो वाहतो लोकहितार्थ काया.
भिक्षापथीं धांवत जाय लक्ष्मी ! **वाग्देवपादांबुज वंदितों मीं.** ४
ब्रह्मस्वरूपीं रत चित्त ज्याचें. साकार जो होय गुण प्रभूचे !
सूर्योपरी तो नचळे स्वनेमीं ! **वाग्देव पादांबुज वंदितों मीं.** ५
पाषाणवर्णासम कृष्ण काया ! पाषाणचित्तास न भेदि माया.
पाषाणमेरुस्थिर गूढ वाणी ! **वाग्देवपादांबुज वंदितों मीं.** ६
जो ब्रह्मचारी अति पूज्य योगी. भूलोकवासांतहि मुक्ति भोगी !
भक्तांस नेई चिरसौख्यधामीं ! **वाग्देवपादांबुज वंदितों मीं.** ७
रे गांजिती षड्रिपु हे समस्त ! हे वेढिती मोहगज प्रमत्त !
दे ठाव आतां तव गोड नामीं ! **वाग्देवपादांबुज वंदितों मीं.** ८

---

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्ययः ।
सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ भ. गीता.



श्री० शांताराम नारायण उर्फ बाबा दाभोळकर ( विद्यमान )

॥ श्रीरामसमर्थ ॥

दाभोळकर कुळीं झाला जन्मोत्तम । नाम शांताराम व्यवहारिक ॥१॥ पिता नारायण माता ती लक्ष्मी । जन्म पुण्यभुमी वेंगुर्लेंची ॥२॥ जन्मनाम ज्ञानदेव, दत्तभक्त । कुळाचें दैवत शांतादुर्गा ॥ ३ ॥ सारस्वत गौड द्वीज कौशिक गोत्र । माझें प्रेम पात्र कृष्ण ह्मणे ॥४॥

मुंबई येथील प्रसिद्ध परोपकारी-पुण्यपुरुष श्रीदत्तभक्त **श्रीमंत शांताराम नारायण** उर्फ **बाबा दाभोळकर** हे सर्वत्र प्रसिद्ध आहेतच. मुंबईतील प्रसिद्ध श्रीबाबुलनाथाच्या देवालया जवळच **'आनंदकानन'** या नांवांचें त्यांचें पवित्र स्थान असून त्या आवारांत त्यांचा स्वतः राहण्याचा बंगला आहे. त्या बंगल्या शेजारींच त्यांनीं वीस वर्षांपूर्वी २५।३० हजार रुपये खर्चून स्वतंत्र **श्रीदत्तात्रेयाचें** देवालय बांधून **श्री**दत्त मूर्तिची स्थापना केली आहे. **श्री**दत्तमूर्तिकरितां मार्बल दगडाचा भव्य व सुंदर देव्हारा इटालीला खास मागणी करून आणविलेला आहे.

**श्री**दत्तात्रेयाची पूजा हे परम भक्तिभावानें स्वतः करित असून आणखी एक दोन स्वतंत्र पुजारीही ठेविले आहेत. एकंदरींत देवळाची व्यवस्था फारच उत्तम ठेविली आहे. वार्षिक **श्री**दत्तजयंतीचा, **गुरुद्वादशीचा** वगैरे उत्साह करित असतात. **श्री**दत्तजयंतीला हे कांहीं वर्षांपुर्वी नऊ रोज प्रेमरसभरित उत्तम कीर्तनें करीत असत, त्यां कीर्तनांचा लाभ मला पुष्कळ वेळां मिळालेला आहे; तेणें करून मला त्यांची सर्वार्थी अत्यंत धन्यता वाटत आहे. **श्री**दत्तमहाराजांच्या कृपाप्रसादानें त्यांजकडून स्वयंस्फूर्ति प्रासादिक प्रेमरसभरित भक्ति-ज्ञान-वैराग्यपर पुष्कळ कविता झालेल्या आहेत. त्यां पैकीं **'श्रीदत्ताख्यानमाला'** या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झालेलें आहेच. त्या प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांतील कवितां शिवाय माझ्या संग्रही त्यांच्या कांहीं कविता होत्या, त्या प्रसिद्ध होऊन त्यांचा लाभ मालेच्या माझ्या आश्रयदात्यांस मिळावा अशी इच्छा झाल्यानें त्या या पुस्तकाच्या शेवटीं पृष्ठ ९१ ते १०१ मध्यें छापल्या आहेत, त्या समस्त वाचकबंधूंनीं वाचून त्यांतील भक्ति प्रेमानंद घ्यावा, एवढी प्रेमपूर्वक विनंति आहे.



**ह. गु. भ. प. खंडो कृष्ण उर्फ बाबा गर्दे.** ( विद्यमान )

गुणग्राहक, निर्मत्सरी, वेदज्ञ ह. भ. बाबा गर्दे हे सन १९१५ मध्यें मुंबईत आले, त्यावेळीं मुद्दाम आमची आठवणकरून आमच्या घरीं येण्याची तसदी घेतली. त्या प्रसंगीं मी घरीं नव्हतों, **श्रीसमर्थ वाग्देव महाराजां**च्या मुक्काम घरीं होता, व ते बाहेर वारीला गेले होते. कांहीं वेळानें घंटा वाजवित घरीं झेंड्या जवळ ( देवाजवळ ) आले. त्यावेळीं ह. भ. **बाबा**नीं प्रेमपूर्वक नमस्कार करून दर्शन घेतलें. मला हे आल्याचें समजल्यावर मी त्यांच्या बिऱ्हाडीं जाऊन त्यांची भेट घेतली आणि त्यांस घरीं आणिलें. ह. भ. बावांच्या पुण्यप्रद दर्शनानें मनाला अत्यंत समाधान व आनंद वाटला. प्रसंगानुसार भक्तिप्रेमाच्या आवडींतल्या गोष्टी निघाल्यावर त्यांतच **श्रीवाग्देव महाराजां**बद्दल मी लिहून ठेविलेले कांहीं लेख त्यांस वाचून दाखविण्याचा मला योग आलाच. मी त्यांस वाचून दाखवित होतों, व ते प्रेमजलपूर्ण नयनानें ऐकत होते, त्या समयाचा त्यांचा अवर्णनीय प्रेमा पाहून माझेही नयन भरून आले ! नंतर आमचा प्रेमसंवाद झाल्यावर त्यांनीं **श्रीगुलाबराव महाराजां**कडे झालेला आपला कवितारूपी पत्रव्यवहार मला परम प्रेमानें दाखविला. तो पत्र व्यवहार पाहून मला आनंद वाटला, व तो संग्रहणीय वाटल्यावरून मी त्याची एक नक्कल उतरून घेतली. ते घरीं जातेवेळीं मी वर दिलेला त्यांचा फोटो ग्यालरीवरच घेतला. हा दिवस १३-३-१५ हा होता. ह. भ. **बावा**नीं जितक्या प्रेमानें त्या कविता माझ्या हातीं दिल्या तितक्याच प्रेमानें त्यांचा लाभ मळेच्या **संतभक्तां**स मिळावा अशी मला उत्कट इच्छा झाली, व ती भगवंतानें पूर्णही केली. त्या कविता पृष्ठ १०२-१०७ मध्यें छापल्या आहेत त्या वाचकबंधूनीं प्रेमपूर्वक वाचाव्यात. ह. भ. **बावां**च्या सुलभ, रसाळ, मधुर अशा काव्यास **श्रीगुलाबराव महाराजां**नीं केलेल्या उत्तरांत त्यांचा अत्यंत नम्रपणा तसाच स्मरणा, अर्थगांभिर्य व मार्मिकता वगैरे गुण पाहून कोणाहि निर्मत्सर वाचकास त्यांच्या ईश्वरदत्त देणगीबद्दल त्यांचा थोर अधिकार व कौतुक वाटल्यावांचून राहाणार नाहीं हे खरें.

## **अध्यात्मरामायणांतील** कांहीं अनुभविक उतारे.

## बालकाण्ड ] विषय महात्म्यम् । [श्लोक ९ ते १६.

**नारदऋषि ब्रह्मदेवाला** ह्मणतात—भयंकर कलियुग प्राप्त झाल्यावर मनुष्यें पुण्यहीन, वाईट आचरण करणारीं, खोटें बोलणारीं, परनिंदातत्पर, परद्रव्याची इच्छा करणारीं, परस्त्रीवर नजर ठेवणारीं, हिंसा करणारीं, आपमतलबी, अज्ञानी, नास्तीक, पशुप्रमाणें आचरण करणारीं, आईबापांचा द्वेष करणारीं, स्त्रियांच्या स्वाधीन होणारीं, विषयोपभोग घेणारीं, लोभी, वेद विकून उपजीविका करणारीं, द्रव्य मिळविण्याकरितां शिकलेल्या विद्येच्या गर्वानें भरलेलीं, आपलें जातिकर्म टाकून देणारीं आणि दुसऱ्याला फसविणारीं–अशीं **ब्राह्मण कुलांत**; आपला धर्म सोडणारे क्षत्रिय तसेंच वैश्य; त्याच-प्रमाणें **ब्राह्मणाचें आचरण करणारे शूद्र**; दुराचारी, निर्भयपणें **नवऱ्याचा अप-मान करणाऱ्या, सासुसासऱ्यांचा द्वेष करणाऱ्या स्त्रिया** अशा तऱ्हेचीं माणसें निःसंषय उत्पन्न होतील. ९ ते १४ ह्या दुष्ट बुद्धीच्या माणसांनां स्वर्गलोक कसा मिळेल, या चिंतेनें माझें मन नेहेमीं व्याकूल होतें १५. ज्याअर्थी आपल्याला सर्व कळतें आहे, त्याअर्थी ज्या थोड्या उपायानें त्यांनां स्वर्गवास कसा मिळेल तो उपाय सांगा ॥ १६ ॥

## **अयोध्याकाण्ड** सर्ग १ ला, श्लोक ६ ते ८.

**श्रीराम नारदमुनींला ह्मणतातः**–रामाला फारच आनंद झाला व ते नारद-मुनीला ह्मणाले–मुनिश्रेष्ठा, संसारी लोकांनां आपलें दर्शन दुर्लभ आहे; ऋषे ज्यांचीं मनें विषयोपभोगांत गढून गेलीं आहेत, अशा माझ्या सारख्यांनां तर तें अतिशय दुर्लभ आहे; ६. ज्याअर्थी मी संसारी असतांनाही मला साधुसमागम घडत आहे, त्या अर्थी मागल्या जन्मीं केलेल्या पुण्याईनेंच हें घडून आलें असावें ७. हे ऋषिवर्या, मी केवळ आपल्या दर्शनानेंच कृतकृत्य झालों आहे; तरी आपलें कोणचें काम मी करावें, तें सांगा ह्मणजे मी तें करितों ८.

## **अयोध्याकाण्ड** सर्ग ६ वा, श्लोक १ ते १९.

**महादेव ह्मणतातः**–रामाला झोंप लागली आहे, असें पाहून गुहकाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या, व तो नम्रपणानें **लक्ष्मणाला ह्मणालाः**–' दादा, तूं रामाकडे पहात आहेसच १. जो उत्तम मंदिरांत सोन्याच्या पलंगावर उत्तम बिछान्यावर निजत असे, तो सीतेसह आज दर्भांच्या व पानांच्या अंथरुणावर निजला आहे. २. दैवानें कैकेयीला **रामाच्या** दुःखाला कारणीभूत केलें; मंथरेच्या नादीं लागून कैकेयीनें ही वाईट गोष्ट केली ३. हें ऐकून **लक्ष्मण ह्मणालाः**–'मित्रा, माझें ह्मणणें ऐक. प्राण्याला सुख किंवा दुःख देण्याला कोण कारण आहे ? ४. सुख किंवा दुःख प्राप्त होण्याला प्राण्यानें मागील जन्मांत केलेलें त्याचें कर्म हेंच कारण होय. ५. सुख किंवा दुःख देणारा कोणी नाहीं; दुसरा आपल्याला सुख किंवा दुःख देतो, असें समजणें ही दुर्बुद्धि होय; मीच अमुक गोष्टी करतों हा अभिमान व्यर्थ आहे; कारण सर्व लोक आपापल्या कर्मरूपी दोऱ्यानें बांधलेले आहेत ६. हितकर्ता, मित्र, शत्रु, उदासीन वैरी, मध्यस्थ आणि सोयरेधायरे, यांनीं स्वतःच पूर्वी कर्मं केलेलें असतें, ह्मणून ते तसतसे निरनिराळे वाटतात ७. मनुष्य

आपल्या कर्माच्या स्वाधीन असल्यामुळें सुख किंवा दुःख जें कांहीं ज्या वेळीं होईल तें त्यावेळीं भोगून त्यानें आपलें अंतःकरण स्वस्थ ठेवावें ८. मला भोग मिळण्याविषयीं किंवा ते सोडून देण्याविषयीं मुळींच इच्छा नाहीं; ते मिळोत अथवा न मिळोत, मी भोगांच्या मुळींच आधीन नाहीं. ९. ज्या देशांत, ज्या कालीं किंवा ज्या कारणामुळें ज्यानें जें जें शुभ किंवा अशुभ कर्म कलें असेल तें तें त्याला तसतशा रीतीनेंच भोगावें लागतें; तें कधींही चुकावयाचें नाहीं, १०. शुभ किंवा अशुभ प्राप्त झालें असतांना आनंद किंवा दुःख होण्याचें कांहीं कारणच नाहीं ब्रह्मदेवानें जें कांहीं ठरवून ठेविलें आहे, तें देवानां किंवा दैत्यांनाही चुकवितां येत नाहीं, ११. मनुष्याला नेहमीं सुख आणि दुःख भोगावें लागतें: कारण हें शरीर पुण्य आणि पाप यांच्या योगानें उत्पन्न झालेलें असल्यामुळें, त्याला सुख आणि दुःख हीं चिकटलेलीं असतात. १२ दिवसानंतर रात्र आणि रात्रीनंतर दिवस, हा क्रम जसा कधीं चुकत नाहीं, त्याप्रमाणें सुखानंतर दुःख आणि दुःखानंतर सुख ही परंपरा प्राण्यांना कधींही टाळतां येत नाहीं. १३. पाणी आणि चिखल हीं दोन्हीं जशीं एकमेकांत मिसळलेलीं असतात, त्याप्रमाणेच सुखामध्यें दुःख आणि दुःखामध्यें सुख, अशीं दोन्हीं एकमेकांत मिसळलेलीं असतात, असें ह्मणतात १४. चांगले किंवा वाईट प्रसंग आले असतां हा सर्व मायेचा खेळ आहे असें समजून, विद्वान लोक धैर्यानें त्याबद्दल आनंदही मानित नाहींत किंवा दुःखही करीत नाहींत. १५.

## श्रीतुकारामोद्गार.

**१ अभंग**–उंच निंच कांही नेणे हा भगवंत । तिष्ठ भाव भक्ति देखोनियां ॥ १ ॥ दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्या घरीं रक्षी प्रल्हादासी ॥ २ ॥ चर्म रंगूं लागे रोहिदासा संगीं । कबिराचे मागीं विणी शेले ॥ ३ ॥ सजनकसाया विकूं लागे मांस । मळा सांवत्यास खुरपूं लागे ॥ ४ ॥ नरहरिसोनारा घडो फुंकूं लागे । चोखयामेळ्या-संगें ढोरें ओढी ॥ ५ ॥ नामयाची जनी सवें वेची शेणी । धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ॥ ६ ॥ नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगीं ओढी ॥ ७ ॥ अर्जुनाचे रथीं होय हा सारथी । भक्षी पोहे प्रीतीं सुदाम्याचे ॥ ८ ॥ गौळियांचे घरीं गाई अंगें वळी । द्वारपाळ बळीद्वारीं जाला ॥ ९ ॥ यंकोबाचें ऋण फेडी हृषीकेशी । आंबऋषीचे सोसी गर्भवास ॥ १० ॥ मिराबाई साटीं घेतो विषप्याला । दामाजीचा जाला पाडेवार ॥ १० ॥ घडी माती वाहे गोऱ्याकुंभाराची । हुंडी मेहत्याची अंगें भरी ॥ ११ ॥ पुंडलिकासाटीं अझूनि तिष्टत । तुका ह्मणे मात धन्य त्याची ॥ १२ ॥

**२ अभंग**–देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याच्या पडे विरा मनुष्यपणा॥१॥ देवाची ते खूण करावें वाटोळें । आपणा वेगळें कोणी नाहीं ॥२॥ देवाची ते खूण गुंतों नेदी आशा । ममतेच्या पाशा शिवों नेदी ॥ ३ ॥ देवाची ते खूण गुंतों नेदी वाचा ॥ लागों असत्याचा मळ नेदी ॥ ४ ॥ देवाची ते खूण तोडी मायाजाळ । आणि हें सकळ जग-हरी ॥ ५ ॥ पहा देवें तेंची बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं ॥ ६ ॥

**३ अभंग**–देवभक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वारावार करीतसे ॥ १ ॥ भाग्य द्यावें तरीं अंगीं भरेताठा । ह्मणोनि करंटा करोनि ठेवी ॥ २ ॥ स्त्री द्यावी गुणवती नसती गुंते आशा । या लागीं कर्कशा पाठीलावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज प्रचित आली देखा । आणीक या लोकां काय सांगों ॥ ४ ॥



## (1) SHRI MANIKPRABHU

( ENTERED SAMADHI ).

Huminabad,

Nizam's Dominions

This Mahatma was born at Kalliana 12 leagues from Kulburga in Mongalai. Sometime aftar he came over to Humnabad. From boyhood till the last he worked thousands of miracles in the presence of thousands of devotees. When really a human corpse was being carried, he asked 'why carry a living man;' he had the corpse brought to him and enlivened it. He gave thousands of rupees, jewellery &c. to poor people. Every day thousands of people were fed. Every month the management of these affairs incurred lacs of rupees at his hands. Shri Manikprabhu has come to be believed all the world over as an incarnation of Shri Dattatraya. At last after intimating to his devotees he entered Samadhi alive and gave up his sacred body, thus finishing the purpose of his incarnation. Age at Samadhi was 46 years.



## (१) श्रीमाणिकप्रभु महाराज, (समाधिस्थ) हुमणाबाद-निजामस्टेट.

हे मोंगलाईंत कुलबर्ग्यापासून बारा कोसांच्या अंतरावर कल्याण गांवीं जन्मास आले, व कांहीं काळानें ते हुमणाबाद येथें गेले. बालपणापासून समाधिकालापर्यंत त्यांनीं हजारों भक्तवृंदासमक्ष अद्भूत चमत्कार केले आहेत. प्रत्यक्ष मृत मनुष्य दहनविधीस नेतेवेळीं जिवंत मनुष्य कां नेतां असें विचारून त्या प्रेतास आपले जवळ आणवून जिवंत केलें आहे. अशा प्रकारचे कल्पनेस थक्क करणारे नानाविध अद्भूत चमत्कार केले आहेत. गोरगरीबांस हजारों रुपये व डागडागीने दिले आहेत. प्रत्येक दिवशीं हजारों लोकांस अन्नदान केलें आहे. यांचें चरित्र दुसऱ्यानें छापलेलें आहे. समाधिसमयीं वय ४६



**(2) SHRI VITHOBA ANNA DUFTARDAR.** (Deceased).

Born–1813.

Died–23rd. April 1873.

Karhad, Dt. Satara.

He was a great devotee of Shri Rama. His sweet and inspired poetic works are well known all over. In boyhood he was very playful and had a passionate love for gymnastics and swimming. As he came to age he studied Shastras and became famous. He was an excellent "Keertankar" and "Sheeghra Kavi." At the 28th. and 30th. years of his age his father and wife respectively died. He had two sons and a daughter. Later on he had partial paralysis which continued for 25 years, but he never failed in his daily devotions. His works Gajendrachampu, Sushlokaraghava, Hetu Ramayana, Vivahatatwa; Sadhuparshadalaghawa, Prabodhostavalaghava, Nityakramalaghava and others are well-known.

## (२) **श्री विठोबा अण्णा दप्तरदार,** कऱ्हाड जि० सातारा.(गत)

जन्म शके १७३५ पौष्य कृ० ३० ] [ समाधि शके १७९५ चैत्र व० ११

श्रीविठोबा अण्णा दप्तरदार हे श्री रामोपासक महान भक्त होऊन गेले हें जगप्रसिद्ध आहेच. यांची कविता पूर्ण प्रासादिक व रसाळ सर्वत्र प्रख्यात आहे. हे बाळपणीं फार खेळाडू होते. त्यांस तालीम व पोहण्याचा नाद फार होता. यांनीं वयांत आल्यावर शास्त्राध्ययन करून लौकिक मिळविला. हे उत्तम कीर्तनकार व शीघ्र कवि होते. वयाचे २८ वे वर्षीं वडील वारले. ३० वे वर्षीं पत्नीचा अंत झाला. यानां दोन मुलगे व एक कन्या होती. पुढें त्यांस अर्धांगवायू होवून २५ वर्षे पर्यंत राहिला, तरी यांनीं आपली उपासना व नित्यनेम किंचितसुद्धां ढळविला नाहीं. निर्याण काळ जवळ येतांच स्नान संध्या आटपून सर्वांनां सांगून श्रीराम नवमीचा उत्साह साजरा केला. व आपला पुण्य देह ठेविला. यांचे गजेंद्रचंपु, सुश्लोक राघव, हेतु रामायण, विवाह तत्व, साधुपार्षदलाघव, प्रबोधोत्सवलाघव, प्रयोगलाघव, नित्यक्रमलाघव वगैरे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. वय वर्षे ६०



## (3) SHRI YASHAVANT RAO Alias DEVA MAMALEDAR.

( Deceased )

BHOSE-DT. PANDHARPUR.

Born 13-8-1816. Died 17-12-1887.

This Saint was Rigvedi Brahmin belonging to Kashiapa Gotra. His family deity was Shri Narasimvha. He was born in his ancestral house in Poona. Yashavant Rao Maharaj was a world renowned Saint of highest order and is known all over. His life was one marked with many miraculous deeds and imparted blessedness all around. A perusal of his life sketch would inspire one unhesitatingly to proclaim that God manisfested Himself in human form in this Saint for the regeneration of humanity. From the beginning to the end his worldly career was characterised by feelings of such unusual tenderness, sympathy, and loving kindness that hundreds of thousands of poor beggars were gratified by him. He first entered Government Service on a salary of Rs. 10/- and eventually rose to the position of Mamaledar on Rs. 200/- per month. He counted a service of 42 years. He was aged 72 years at demise. His life has been published.

## श्रीयशवंतराव महाराज उर्फ देवमामलेदार, (समाधिस्थ)

भोसे—जि. पंढरपूर.

(३) जन्म शके १७३७ भाद्रपद शु० ] [ समाधि शके १८०९ मार्गशीर्ष. कृ ११.

हे ऋग्वेदी काश्यपगोत्री असून ह्यांचा कुलदेव श्रीनृसिंह होय. ह्यांचा जन्म पुणें मुक्कामीं त्यांच्या आजोळीं झाला. यशवंतराव महाराज जगविख्यात अलौकिक सत्पुरुष होऊन गेले हें सर्वत्र प्रसिद्ध आहेच. यांचें अनेक अत्यद्भूत चमत्कारांनीं ओथंबलेलें असें सानंददायक हृद्यंगम चरित्र छापून प्रसिद्ध आहे. तें वाचतांच हे केवळ मानवरूपानें जगदुद्धारास्तव ईश्वरच प्रगटले असें निःसंशय ह्मणावें लागतें. यांच्या अंगीं अगदीं बालपणापासून देहपर्यंत दया धर्माचा एवढा अलौकिक गुण होता कीं, त्यांजकडून हजारों याचकांचें कल्याण झालें आहे. शेवटीं वरील रोजीं श्रीक्षेत्र नाशिक येथें गोदावरीतीरीं श्रीहरि चिंतनानें आपला पुण्यदेह ठेविला. वय वर्षे ७२.



## (4) SHRI SHIVABHINAVA NARASIMHA BHARATI,

Sringeri ( late )

Born 1858. Died March 1912.

His father himself a great professor of Logic, was foremost amongst the disciples of the distinguished scholar, Trimbak Sastri. He lost his father before his third year, and in his ninth year was adopted by Narasimha Bharati, the then Sankaracharya, as his disciple. He succeeded his Guru at his age of 21, and became famous as a Pandit of rare attainments and a Yogee of a high order. In February 1910, His Holiness consecrated two grand temples at Kaladi, the birthplace of the Great Sankaracharya. Early in 1911, His Holiness opened at Banglore, the most imposing edifice of that noble Temple of Learning, the "Indian Sanskrit Institute." His benevolence and charities knew no bounds and all that his devotees used to give him during his long tour—not excepting the 17 1/2 lakhs of his last tour—he spent in the furtherance of noble causes. He also made liberal annual grants to Vaishnava and other institutions.

## (४) श्रीसच्चिदानंद शिवाभिनव नरसिंह भारतीस्वामी,

श्रृंगेरी ( समाधिस्थ )

जन्म शके १७७९ ] [ समाधि शके १८३३ चैत्र शु० २

त्यांच्या वयाच्या तिसऱ्या वर्षी वडील निवर्तले व वयाच्या नवव्या वर्षी त्या वेळचे श्रीशंकराचार्य नरसिंह भारती यांनीं यांस आपल्या गादीचा अधिकारी करण्याकरितां दत्तक घेतलें. एकविसाव्या वर्षी त्यांस गादी मिळाली. हे मोठे योगी व पंडित होऊन उदयास आले. मूळ शंकराचार्यांच्या जन्म भुमीजवळ सन १९१० मध्यें यांनीं दोन जंगी देवालयें बांधिलीं. १९११ मध्यें बेंगळूर येथें "हिंदुस्थानांतील संस्कृत शाळा" या करितां मोठें गृह बांधलें. यांजकडून धर्म व परोपकार शिकस्तीनें होत असे. हे सर्वत्र संचारार्थ फिरत असतां त्यांस मिळालेले साडे सतरा लाख रुपये ठिकठिकाणीं देणग्या देवून सत्कृत्यांतच त्यांचा व्यय केला.



**(5) Shri Madhavdas Malser (Living)**

This saint was born in a small village near Shantipur in the district of Nadia. At present he has been living at Malser in the Khas-Chauk-Ashram established by him. When quite young he visited the four Dhamas accompanied by a large company of saints through Bengal by the way of Puri on the Southern side in about three years. After some time he completed his pilgrimage from Hardwar through Kashmir to Cape Camorin, and from Karachi to Calcutta accompanied by nearly seven hundred saints. He has fully accomplished the Hatayoga by studying the Yogashastra and remaining only on a food of chillies and living in a solitary place. When he left Cutch for Kathiawad, he was known by the name of Sakaria Buva from his possessing one small pot full of sugar which though distributed as a prasad amongst his innumerable devotees ever remaind full. It is said that even H. H. the Gaikwad of Baroda has full devotion towards him.

**(५) योगींद्र श्री माधवदास.** मालसर, ( विद्यमान. )

यांचा जन्म नदिया जिल्ह्यांतील शान्तिपुरच्या जवळ लहानशा खेड्यांत झाला. प्रस्तुत हे ‘ मालसर ’ येथें ‘ खास चौक आश्रम ’ स्थापन करून राहिले आहेत. अगदीं लहान वयांतयांनीं पुष्कळ साधुवृंद बरोबर घेऊन बंगाल्यांतून पुरीच्या मार्गानें दाक्षिण बाजूनें त्या साधुवृंदासह चारी धामांची यात्रा पुरी केली. कांहीं काळानें परत हरिहर येथून सुमारें सातशें साधूंसह काश्मीरपासून कन्याकुमारी व कराची पासून कलकत्ता फिरून आले. यांच्याजवळ एक लहानशी साखरेनें भरलेली वाटी असे, त्यांतून ते कितीहि इसम येवोत त्यांस प्रसाद देत असत तरी ती वाटी संपत नसे. श्रीमंत राजे सयाजीराव महाराज गायकवाड यांची यांचे ठिकाणीं उत्तम निष्ठा आहे असें समजतें. यांचें संक्षिप्त जीवनचरित्र गुजराथी भाषेंत श्रीयुत लिलु चुनीलाल मझमुनदार यांनीं सन १९१६ सालांत प्रसिद्ध केलें आहे. वय दीडशेंवर आहे असें ह्मणतात



### (6) Shri Brahmananda Saraswati, Benares (Living)

This saint belonged to a wealthy household but the wealth was spent for charitable purposes and for the good of others. He travelled from the southernmost Ramasetu to the northernmost Himalaya and offered Pindas in honor of his parents in one thousand Tirthas notable in Puranas. He mastered Ashtanga-yoga in method of Shatkriya Sadhana. He had vision of Shri Datta incarnate Manik Prabhu and is a devout Dattopasak. The late Shri Vasudevanand Saraswati was regarded by him as his very life. Once he lived for months nearely on cow's urine. It was he who first made Prattishta of Shri Shankarachaya's idol. In Tellur he performed a grand Sacrifice by name Shri Dutta Sarvatomukha. He established Muths in Pandharpur, Nasik Hardwar, Nellur and in era 1819 he has commenced Brahma Satra in Benares.

### (६) श्री ब्रह्मानंद सरस्वति स्वामी, शृंगेरीमठ-काशी, ( विद्यमान )

जन्म भाद्रपद शु० १५ रुद्रोद्गार संवत्सर.

हे घरचे मोठे श्रीमान् परंतु सर्व संपत्ति धर्मकार्यार्थ व परोपकारार्थ खर्च केली यांनीं आसेतु हिमाचल फिरून पुराणप्रसिद्ध एक हजार तीर्थांवर आपल्या माता पितरांबद्दल पिंडप्रदान केलें. यांनीं षट्क्रियासाधनपूर्वक अष्टांगयोग साध्य केला असल्यामुळें त्या विषयासंबंधानें यांची माहिती सानुभव आहे. श्रीदत्तावतारी माणिक प्रभूचें यांनां दर्शन झालें असून हे एकनिष्ठ दत्तोपासक आहेत. ब्र. भू. श्री वासुदेवानंद सरस्वति यांनां हे आपले पंचप्राण मानित होते. श्री शंकराचार्यांच्या मूर्तींची पहिली प्रतिष्ठा यांनीं केली. पंढरपूर, नाशीक, हरिद्वार , तेल्लूर ठिकाणीं मठस्थापना केली. शके १८३९ सालांत काशी येथें यानीं ब्रह्मसत्र सुरू केलें. मुंबईत आल्यावर हे श्रीयुत आनंदराव ग. धैर्यवान यांच्या घरीं उतरतात.



## (7) Shri Muragindra Swami, Athani.

(Living)

This sage is perfect ascetic and profound in spiritual knowledge His only garments are a piece on his shoulders At Athni he has a big monastery, where he daily expounds Puranas in Canarese and a large number of devotees assemble to hear him. He does not stay in the Matha, but goes there only for that purpose Greater part of his life is spent in the temple of Siva, absorbed in devotion to the Linga. The devotees daily adoring the sage have been expecuous manifestation. Though he appears to be nearly 90 years of age and worn out in body, yet he is active and goes out for a walk whenever he pleases. He has erected a big Samadhi for his interment, and people say that he would one day enter it at free will.

## (७) श्री मुरगेंद्र स्वामी, अथणी, गचीन मठ. जि. बेळगांव. (विद्यमान)

हे अत्यंत विरक्त असून पूर्ण ज्ञानी आहेत. सर्वकाळ उघडेच रहातात. लंगोटी शिवाय अंगावर कदाचित् छाटी असली तर असते. हे जनउपाधी फारसे लावून घेत नाहींत. अथणी येथें यांचा मोठा भव्य मठ आहे. नियमित वेळीं कानडी भाषेंत पुराण सांगतात; पुराण सांगण्यापुरतेच मठांत जातात. त्या वेळीं भक्तजनांची फारच गर्दी होते. बहुधा ते शिवाच्या देवळांत शिवलिंगाजवळ तल्लीन होऊन समाधींत बसलेले असतात. भक्तमंडळी यांची नित्य पादपूजा करितात त्या वेळीं भक्तांस आपापल्यापरी अलौकिक चमत्कार अनुभवास येतो. प्रस्तुत यांचें वय सुमारें ८५।९०वर्षांचें असल्यामुळें शरीर फारच क्षीण झालें आहे. तथापि लहर लागली तर चटकन् जाऊन बाहेर फिरून येतात. त्यांनीं आपल्यासाठीं तेथें एक मोठी समाधी बांधून ठेविली आहे व ते स्वइच्छेनें समाधिस्थ होणार असें कळतें.



### (8) Shri Sorakayya Swami, (Late)

Died 9th Aug. 1902. So called from his habit of carrying the shell of bottle ground (Sorakaya) for eating or drinking purposes. The place and date of his birth are not known. He was first seen in May 1815 at Narayanavaram an ancient town, near the North west line of the Madras Railway. In days gone by, this town, with its environs, was considered as the haunts of sages and holy men. At first sight he appeared to be ordinary beggar, ill-clad matted beard, with a big turban on his head; but his face beamed with intelligence and in his eyes were flickering certain lights which showed that he was a man of superhuman powers. The sage taught both by precept and example the most universal maxims of ethical code of not wounding the feelings of any body and very sympathetic in the affliction of others. He deeply impressed on the minds of his devotees the virtue of showing kindness not only to human beings, but also to beasts and fowls. His courtesy to his visitors was unbounded. He paid attention to one and all, to the poor and rich alike. His temper was genial, forbearing and dignified.

### [८] श्री सोरकय्या स्वामी, मद्रास [ समाधिस्थ ] समाधि शके १८२२

हे मूळचे कोठले वगैरे कांहीं समजत नाहीं. सन १८१५ मे महिन्यांत मद्रासांतील नारायणवरंम या शहरांत प्रथम उदयास आले. हें शहर पूर्वी साधुसंतांच्या वसाहतीचें होतें. एखाद्या भिक्षुकासारखे गलिच्छ, दाढी वाढलेली, डोक्यास ओबडधोबड मोठें पागोटें बांधलेलें अशा वेशानें तेथें असत. परंतु ते पहाणारास अधिकार संपन्न वाटत. यांचें भाषण पूर्ण बोधपर असल्यामुळें लोकांचे थव्यांचे थवे त्यांचेजवळ जमावयास लागले, व त्यांच्या ठिकाणीं पूज्य भावना ठेवूं लागले. यांचा सर्वकाळ बोध असा असे कीं, सर्व प्राणीमात्रांस भूतदया ठेवावी, दुःखितांस आश्रय द्यावा वगैरे. यांची सर्वांभूतीं समबुद्धि होती. हे फार चपळ, चतुर व त्रिकाळज्ञानी होते. हे कितीहि जरी लांब अंतर चालले तरी तिळमात्र थकत नसत. हे कधीं कधीं भिक्षा मागत. यांच्या हातांत खाण्यापिण्याचें पात्र [सोरकायी] असे, यावरून यांस सोरकायी स्वामी असें नांव पडलें. यांजकडून सहजासहज पुष्कळ चमत्कार घडलेले आहेत. यांच्या मुखांतून निघे तें सत्य होई.



## ( 9 ) Shri Sundarnath.

Kadri, S.C. (Late)

**Shri Sundarnath** was installed as Raja of Kadri Matha of Yogis, near Mangalore. After some time Sundarnath suddenly disappeared and later on he stayed and continued in his Yoga-sadhan at the Babulnath Temple in Bombay, and his enlarged photo has been still hung there on one of the walls. Most melancholy news has been brought by Tahalnath of the death of the Yogi Sundarnath. It appears, only a few months ago when he was deeply immersed in Yoga in a forest at Tehari near Kumaon in the Himalaya regions a certain . . . . happened to see him in the course of his hunting excursion, and asked the Yogi who he was and why he was sitting there, etc. As the . . . . got no reply he was so enraged that he threw a firebrand from the fire burning in the Yogi's front and went away. Next day when the man came to the spot he found the good soul had passed away and his body was still lying in the Yoga attitude and all its lower part burnt off.

## (९) **श्रीसुंदरनाथ**, कद्रीमठ (मंगळूर, द. का.) ब्रह्मीभूत.

हे मंगळूरकडील असलेल्या योग्यांच्या कद्रीमठाचे मुख्य अधिपति होते. कांहीं काळानें श्रीसुंदरनाथ तेथून नाहींसे झाले, ते मुंबईत बाबुलनाथ देवालयांत येऊन योगसाधनांत तल्लीन होऊन बसले. मुंबईतील हजारों मंडळी यांच्या दर्शनास जाई, परंतु हे एक शब्द देखील कोणाकडे बोलत नसत. अधोदृष्टीनें बसत. त्यांच्या निर्याणाबद्दल तहलनाथ (त्यांचे शिष्य) यांस असें दुःखद वृत्त कळलें कीं, हिमालय कुमाजवळील तिहारी नांवाच्या घोर अरण्यांत हे योगसाधनांत गर्क झाले असतां एका युरोपियन गृहस्थानें आपण शिकार करतेवेळीं त्यांनां पाहिलें, व प्रश्न केला कीं, तूं कोण आहेस? व कशासाठीं इकडे बसलात? ते आपल्या समाधींत असल्यामुळें त्यास उत्तर मिळालें नाहीं. तेव्हां त्यास त्यांचा इतका राग आला कीं, त्यांच्यासमोर जळत असलेल्या धुनींतील आग्नि त्यांच्या अंगावर टाकला व चालता झाला. दुसऱ्या दिवशीं येऊन तो पाहतो तों श्रीसुंदरनाथांचा देह आसनावरच दग्ध होऊन प्राणोत्क्रमण झालेलें पाहिलें! हर हर!!!



**(10) Shri Bramhananda-Maharaj,**

Narmadabanks.

(Deceased)

This Maharaj was a saint of highest renunciation. His fame has spread all over northern India and there he is known by name "Shri Bramhananda of Narmadatir." Originally he resided in Kurukshetra; when Ranajit Singh visited Afghanistan for the first time this saint was with him and was aged 25 years. When Ganganath came to the banks of the Narmada he was very old. Thereafter he stayed there for 60 years. He used to come over to Bombay. At his demise his age is said to have been 200 years.

—:o:—

( १० ) **श्रीब्रह्मानंदमहाराज**, नर्मदातीर (समाधिस्थ.)

हे महाथोर संत होऊन गेले. ह्यांची प्रख्याति उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र आहेच. हे मुळचे कुरुक्षेत्रींचे रहाणारे होते. रणजितसिंगाची पहिली स्वारी अफगणीस्थानावर झाली, त्या वेळीं त्यांच्या स्वारींत हे होते. त्या वेळीं यांचें वय पंचवीस वर्षांचें होतें. ज्यावेळीं गंगनाथ नर्मदातीरावर आले, त्यावेळीं हे फार वृद्ध होते, त्यानंतर हे तेथें ६० वर्षे राहिले. मुंबईंतही यांची स्वारी येत असे. अंतसमयीं यांचें वय २०० वर्षांचें होतें असें ह्मणतात.



## (11) Shri Akkajana,

Belgaum,

(Living).

This saint stays in Deshapande Street in Belgaum where he is well-known throughout. He is a highly evolved saint in superconscious state and is naked. The devotees attending on him are convinced of and testify to the fact that his answers to questions on mundane and divine matters prove to be full of experience. He attracts devotion and confidence even from great men of learning. A visit to him inspires bliss. People even from distant places go to visit him. Age above 50 years.

—:o:—

## ( ११ ) श्री अक्काजाना, बेळगांव ( विद्यमान. )

हे बेळगांवांस देशपांडे गल्लींत कोणाच्या तरी ओट्यावर बसलेले असतात. तेथें हे सर्वत्र प्रसिद्ध आहेत. नग्न दिगंबर स्थितींत असतात. अंतर्ज्ञानी अधिकारी सत्पुरुष आहेत. प्रपंच व परमार्थ या संबंधीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें यांजकडून येतात तीं अनुभवास जुळतात अशी त्यांच्या समागमांत असलेल्या भक्तमंडळीची पूर्ण खात्री आहे. ह्यांच्या चरणीं मोठमोठ्या विद्वानांची देखील पूर्ण श्रद्धा आहे. यांच्या दर्शनानें प्रेमभाव उत्पन्न होतो. दर्शनार्थ दूरदूरची देखील मंडळी जात असते. वय अजमासें ५० वर.



## ( 12 ) Shri Banemiya Maharaj, Aurangabad, (Living)

No information is available as to the origin and past history of this saint. He has been in Aurangabad for very many years. Being from the beginning a spiritual adept, he is well known all over and many have become devoted to him. As he is in a super-conscious state his conduct is often incoherent like that of a child or devil and he remains naked. At present he is very old and his body appears very much worn out. When conveying him any where, an individual carries him on his back. He is always merged in his divine blissfulness. From the fulfilment of their purposes due to him, many are convinced of his greatness. A visit to him fills one with bliss and peace. Age about 90 years.

---:o:---

## ( १२ ) श्री बनेमिया महाराज, औरंगाबाद ( विद्यमान. )

हे मुळचे कोठचे रहाणार वगैरे माहिती मिळत नाहीं. औरंगाबादेमध्यें हे पुष्कळ वर्षे असतात. तेथें हे एक अवलिया सिद्ध पुरुष असल्याबद्दल सर्वत्र प्रसिद्ध असून ह्यांच्या चरणीं पुष्कळांची श्रद्धा आहे. नग्न दिगंबर असतात. प्रस्तुत हे शरीरानें इतके निर्बल झाले आहेत कीं, ह्यांच्या भक्तांस यांनां आपले घरीं न्यावयाची इच्छा झाल्यास मनुष्याच्या पाठीवर बसवून नेतात. ह्यांजकडून पुष्कळांचें कार्यभाग होऊन त्यांस अनुभव साक्षात्कार मिळालेले आहेत. ह्यांच्या दर्शनानें मनाला फारच आनंद व समाधान वाटतें. वय वर्षे ९०.



## ( 13 ) SHRI CHIP CHIP MAHARAJ ( Living ) KOLHAPUR.

Nothing is known as to what place he belonged. He never says anything. He speaks but rarely in Telugu, which raises the surmise that he is a Telugu. Once a Telugu man came to visit him and talked in Telugu. He then put his two fingers inside his two cheeks and forcibly tore them bringing about a flow of blood in profusion. He usually sits in a jungle at Kolhapur, where he stays at present and the **Maharaja** of the place has arranged for feeding him. He eats, if he likes and wanders where he likes. Being a saint worthy of respect, large number of devotees visit him.

## (१३) श्री चिप चिप महाराज, संस्थान कोल्हापूर. ( विद्यमान )

हे मुळचे कोठले रहाणारे हें खुद्द त्यांजकडूनही समजण्याचा मार्ग नाहीं, कारण हे कोणाशीं कांहींच बोलत नाहींत. क्वचित् आपल्याशीं तेलंगी भाषा बोलतात, यावरून हे तेलंगी असावेत असा अजमास होतो. एकवेळ कांहीं तेलंगी लोक त्यांच्या दर्शनास आले व तेलंगी भाषेंत कांही बोलले, त्यावेळीं त्यांनीं आपल्या दोनही गालांत आपलीं बोटें घालून गाल फाडून घेऊन भळ भळ रक्त निघे पर्यंत पाळी आणिली. कोल्हापुरांत पूर्वी हे एका वनांत बसत असत. प्रस्तुत कोल्हापुरीं मुक्काम असून तेथील **श्री छत्रपती शाहु महाराजांनीं** त्यांची खाण्या पिण्याची व्यवस्था उत्तमच ठेविली आहे. हे मनास वाटल्यास कांहीं खातात व मनास वाटल्यास फिरतात. दर्शनीय सत्पुरुष असल्यामुळें त्यांच्या दर्शनार्थ पुष्कळ भक्तमंडळी जात असते.



## (14) SHRI SAYABA MAHARAJ. (Late) GWALIOR,

This **Saint** lived in Gwalior for many years in naked condition opposite the palace of the present **Raja Shrimant Jayajirao Maharaj Sindia.** He was perfect in spiritual knowledge and was respected even by the worthy gentlemen of Gwalior, who always experienced something miraculous in his actions. The Raja Sindia Maharaj had full devotion towards him. He sometimes visited the palace too. He talked only when he was in good mood. He was well-known in Gwalior and many other places. His talks towards his devotees contained some bad words but the devotees perfectly knew what they were meant for.

## ( १४ ) श्री सायबा महाराज, ग्वाल्हेर ( ब्रह्मीभूत )

हे अवलिया सत्पुरुष नग्न दिगंबर स्थितींत ग्वाल्हेर मुक्कामीं विद्यमान **राजे श्रीमंत जयाजीराव महाराज सिंदे** यांच्या राजवाड्या समोर कित्येक वर्षे होते. हे पूर्णाधिकारी असल्यामुळें ग्वाल्हेर मधील बड्या बड्या मंडळीस त्यांचा अनुभव साक्षात्कार मिळत असे. त्यांचे ठिकाणीं **श्रीमंत सिंदे महाराजांची** उत्तम निष्ठा आहे. हे लहर लागलीतर राजवाड्यांत देखील कधीं कधीं जात असत. लहर लागल्यास कधीं तरी बोलत असत. हे ग्वाल्हेर व इतर ठिकाणीं सुप्रसिद्ध होते. त्यांचे बोलणें लोकांस शिवीगाळी प्रमाणे भासे, परंतु त्या त्यांच्या बोलण्यांतील पूर्ण अनुभव भक्तमंडळींस मिळे.



## (15) SHRI MADDUR MAHADEVA SHASTRI,

Bangalur, Dist Salem (late)

Born 1832) (Died 22nd. Aug. 1915

He was brought up amidst the best Oriental traditions characteristic of the household which he adorned. This hero gave early proofs of his proclivities thus illustrating the oft quoted adage "Child is father" to the man. He was very marvel of his teachers. He kept up strict rules of Brahmacharya, during which he mastered the various Shastras and Vedas and took to Yogic practices early in life. Married in obedience to the will of his parents, had a son. His responsibilities as a householder began and ended with the birth of a male offspring. Then he bade good-bye to all earthly concerns, and said to his wife. "Bring up this child well; he is your pillar." His life is studded with several strange anecdotes which make for the entrancement and edification of every interested reader. A finishing touch may be given to this necessarily very laconic survey with the remark that this Oriental Saint believed and practised the dictum that nobody was his slave, not he of it.

## (१५) श्रीमदुर महादेव शास्त्री, बेंगळूर ( गत )

जन्म शके १७५३ ] [ समाधि शके १८३६.

हे बाळपणीं शाळेंत जात त्यावेळीं त्यांच्या अभ्यासाकडे, व कृतीकडे पाहून शिक्षक चकित होत असत. पुढें वेदाध्ययनांत व योगशास्त्रांत पूर्णदशेस येईपर्यंत यांनीं कडक ब्रह्मचर्य पाळलें होतें. आपल्या आईबापांच्या अत्याग्रहावरून यांनीं लग्न केलें, पुढें त्यांस एक मुलगा झाला त्यावेळीं त्यानीं आपल्या प्रपंचाची जबाबदारी सोडण्या करितां गृहिणीस म्हटलें कीं, "या मुलास तूं संभाळ, हा तुझा आधारस्तंभ आहे" असें सांगून आपण प्रपंचाचा त्याग केला. ह्यांचें सबंध आयुष्य यांच्या सहवासांत असणाऱ्या भक्तांस पूर्णचमत्कारांनीं भरलेलें असें अनुभवास येई. ह्यांजकडून असे चमत्कार होत कीं, ज्यांस संतती नसे त्यांस त्यांच्या विभूतीनें संतती प्राप्त होई, व दुर्धर व्याधीनें जर्जर झालेले पीडित लोक दोषमुक्त होत असा त्यांचा अधिकार होता अंत समयीं वय वर्षे ८३



## (16) SHRI BABA PREMA-NANDA BHARATI.

( Deceased ) Calcutta.

Born 1835 ) ( Died 1909

He was a saint full of divine cheerfulness as his blissful name indicates. He had mastered the Hindu Philosophy under the tution of learned philosophers. He was the worshipper of Shri Krishna. As he was anxious that Hindu Sanatan Dharma should prevail all over the world he proceeded to Europe in 1902 and began to preach to the people divine wisdom. He visited England, and America twice. He was also in Paris for some time. By his sweet eloquence he attracted the minds of the learned and great men of these countries to such an extent that they came to regard him as worshipful teacher. He delivered lectures on Dharma, which were published in the newspapers there. He was the Vice-President of the World's Congress of Peace, which had assembled in Boston in 1904 &c. &c. He was thus an object of universal love and had risen above the opposites of such as love & hatred &c.

## १६ श्री स्वामी बाबा प्रेमानंद भारती, कलकत्ता. ( ब्रह्मीभूत )

जन्म शके १७५८ ] [ समाधि शके १८३२

हे आपल्या आनंदमय नांवा प्रमाणेंच प्रेमानें ओथंबलेले सत्पुरुष होते. त्यांनीं आपल्या सनातन हिंदुतत्वज्ञानाच्या उच्च शिक्षणाचा लाभ करून घेतला होता. त्यांची **श्रीकृष्ण** उपासना होती. आपल्या सनातन धर्माचा पसार सर्व जगभर व्हावा अशी त्यांची उत्सुकता असल्यामुळें इ. स. १९०२ मधें यूरोपची सफर करून तेथील लोकांस यांनीं यथेच्छ बोधामृत पाजण्याचा प्रारंभ केला. इग्लंड, अमेरिकेचा प्रवास त्यांनीं दोन दोन वेळा केला होता. प्यारीस येथेंही कांहीं काळ होते. त्या देशांतील थोर थोर विद्वानांची मनें यांनीं आपल्या अमृत वाणीनें एवढीं आकर्षण करून घेतलीं होतीं कीं, ते त्यांस परमपुज्य श्रीसद्गुरुस्थानीं मानीत असत. त्यांचीं व्याख्यानें तेथील वृत्तपत्रांत सदैव येत असत. यांनां सन १९०४ सालीं बोस्टन शहरीं भरलेल्या सर्वजगाच्या शांतता परिषदेचे उपाध्यक्ष निवडलें होतें.



## (17) Shri Swami Abhedananda, Calcutta, (Living)

This saint belongs to the sect of Shri Ramkrishna Paramahamsa, and, like Swami Vivekanand he has left India on a mission to spread the religion of Vedanta throughout the world. At present he has been living in America in the established convent where he has been preaching by means of lectures the principles of Vedanta, and in this way fulfilling his mission. He has studied Eastern and Western philosophy comparatively and explains it at ease. The subject of philosophy being very difficult to understand, is made very easy in his several pamphlets which he has published. He has proved by his own instance that the secret of Sanyasa was in serving the world.

---

## ( १७ ) श्रीस्वामी अभेदानंद, कलकत्ता ( विद्यमान )

हे प्रसिद्ध श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या सांप्रदायांतले असून श्रीस्वामी विवेकानंदांप्रमाणें सनातन वेदांत धर्माचा प्रसार व्हावा ह्मणून हल्लीं अमेरिकेंत स्थापन केलेल्या मठांत राहतात व आपल्या अधिकारयुक्त वाणीनें व्याख्यानद्वारा आपलें कर्तव्य बजावित आहेत. ह्यांचा इंग्रजीचा दांडगा अभ्यास असून पाश्चात्य तत्त्वज्ञानावरील सर्वत्र ग्रंथांचें यांनीं अवलोकन केल्यामुळें पाश्चात्य व पौर्वात्य तत्वज्ञानाचें तुलनात्मक विवेचन सहज करतां येते. वेदांत हा विषय रुक्ष असल्यामुळें त्यांची सर्वांना गोडी लागावा ह्मणून यांनीं इंग्रजींत लहान लहान बरींच पुस्तकें लिहिलीं आहेत. संन्यास ह्मणजे लोकसेवेची गुरुकिल्ली हें यांचें ध्येय असून तें ह्यांनीं आपल्या आचरणानें सिद्ध करून दाखविलें आहे.



### (18) Shri Satchidashrama
Lonar, (Deceased)
Dt. Berar.

This saint was the resident of Arosi in Savantwadi side. He was a learned man. As he got painful blisters in his toes he was tired of the world and started on pilgrimage to Benares. On his way when he reached Lonar, the people there described to him the greatness and efficacy of the waters of the local "Bhogavati Teerth" and induced him to stay there to avail of the benefits of the Teerth. He did so and bathed thrice daily for one month in that sacred "Teerth" water. In consequence of his strong faith, his disease disappeared and he was restored. From this personal experience his faith in the efficacy of the said Teerth grew to such an extent that he resided there permanently. Mr. Yadava Madhav Kale, Vakil, has published a small book entilted 'Description of Lonar.' It contains the life of the sage and much other information,

---

### ( १८ ) श्री सच्चिदाश्रम, लोणार ( समाधिस्थ ) जि० बुलढाणा.

समाधि शके १८२६ ज्येष्ठ शुद्ध ६

हे सावंतवाडीकडील आरोसी गांवचे रहाणारे होते. हे चांगले पढलेले होते. ह्यांच्या पायाच्या आंगठ्यास कोंब फुटल्यानें संसारत्रासानें काशी यात्रेस निघाले. रस्त्यांत लोणार गावीं पोंचले. तेथील मंडळीनें त्यांस लोणार मधील भोगावती तीर्थाचें माहात्म्य सांगितल्यावरून तेथें त्यांनीं एक महिनापर्यंत त्रिकाळ तीर्थस्नान केलें. त्यांच्या त्या बलवत्तर श्रद्धायुक्त निश्चयाप्रमाणें पायाचा कोंब अजिबात गळून पडून ते दोषमुक्त झाले. स्वानुभवांतीं यांची त्या भोगावती तीर्थावर इतकी श्रद्धा बसली कीं, ते तेथें कायमचेच राहिले. श्रीयुत यादव माधव काळे वकील, यांनीं 'लोणार वर्णन' या नावांचें लहानसें पुस्तक केलें आहे त्यांत ह्यांची बरीच माहिती आहे.



**(19) Shri Vishnu Bova Brahmachari**

( Deceased ) Bombay.

This sage was very learned in Vedanta. Mlencha or Christian religion had much progressed in Bombay. At that time he delivered frequent lectures refuting that religion to the conviction of the people. Consequently his fame spread all over Bombay and he became adorable. He wrote a small but excellent work called **"Bhawarthsindhu."** He has besides written **" Vedokta Dharma Prakash "** Commentary on **" Setubandhani Bhavarthadeepika "** &c. Going to the butchering places he lectured very lively on the pangs and feelings of cows when being butchered to death and moved the hearts of the butchers with the result that they gave up butchering cows in a number of places in their jurisdiction. He was both a philosopher and a yogi. He has given in his **"Vedokta Prakash"** information regarding the practice of yoga. He has also written a book called Small Vedokta Prakash or the refutation of Christian religion. But these books are not available now.

**( १९ ) श्री विष्णुबुवा ब्रह्मचारी** ( गत ) मुंबई.

हे वेदांतविषयांत महा निष्णात होते. म्लेंच्छ मताचें प्रस्थ मुंबईत फार माजलें त्यावेळीं त्याचें ह्यांनीं वेळोवेळीं व्याख्यानें देऊन खंडण करून लोकांची खात्री केलेली आहे. तेणेंकरून ह्यांची मुंबईत मोठी कीर्ति होऊन ते वंदनीय झाले होते. ह्यांनीं वेदांत विषयावर " भावार्थसिंधु " हा ग्रंथ लहानच पण फारच उत्तम प्रकारें रचिला आहे. याशिवाय वेदोक्त धर्मप्रकाश, सेतुबंधिनी टीका वगैरे ग्रंथ रचिले आहेत. ह्यांनीं गोवधाच्या ठिकाणीं जाऊन त्या प्राण्याचे हाल मरतेवेळीं कसे होतात हें दाखवून त्यावर व्याख्यानें देऊन खाटकांचींही अंतःकरणें पाझरून सोडिलीं आहेत. त्यांनीं आपल्या हयातींत पुष्कळ ठिकाणचा गोवध बंद केला. हे ज्ञानी व योगीही होते. योगमार्गाची सप्रयोग माहिती यांनीं आपल्या " वेदोक्त प्रकाश " ग्रंथांत दिली आहे छोटा वेदोक्त प्रकाश अथवा ख्रिस्ती धर्मखंडन नांवाचें पुस्तकही यांनीं केलेलें असून प्रसिद्ध आहे; परंतु हीं पुस्तकें हल्लीं दुर्मिळ आहेत.



## (20) Shri Lavande Maharaj
Goa, (Late)

Born—1837 ] [ Died—1917.

This saint was born in the 7th month of pregnancy of his mother. His childhood itself was admirable. He was very playful In his boyhood. He twice met a serpent, which raised and shook its hood but never stirred from its place. In dream be had vision, which gained for him knowledge of medical science.

Later on, being a renowned physician he saved the lives of many a patient on the point of death by supernatural powers, as it were. His life, full of miraculous workings and affording a pleasant reading, was published by me in 1904 and is now available.

He was very punctual in his divine services and a devotee of the highest order. His usual talk was full of Vedanta philosophy. He was heart and soul devoted to disinterested service which became his very nature. He was free from desires, unattached and truthful. He was the devotee of Shri Devaki Krishna in Goa-mahashal. He had previously intimated to certain associates as to where and how he would give up his body. His age at death was 86 years.

## ( २० ) श्री लवंदे महाराज गोमंतक. ( गत )

**जन्म**-शके १७५२ का० व० १ ] [ **निर्याण**-शके १८३९ आषाढ शु० ११

हे सत्पुरुष मातुश्रीच्या सातव्या महिन्यावर जन्मास आले. शिशुत्वावस्थेंत ह्यांची कृती फारच चमत्कारीक होती, हे फारच खेळाडू होते. बाल्यावस्थेंत ह्यांना दोन वेळां नागसर्पाचें दर्शन होऊन ह्यांच्या सन्मुख आपली दिव्य फडा डोलवीत ते स्थिर वृत्तीनें राहिले होते. ह्यांस स्वप्न साक्षात्कार होऊन वैद्यविद्या प्राप्त झाली होती. पुढें हे भिषग्वर होऊन ह्यांच्या हातून ( अलौकिक चमत्कारानें ) मरणोन्मुख जनांस प्राणदान मिळालें आहे. ह्यांचें नानाविध चमत्कारांनीं भरलेलें चरित्र आह्मीं सन १९०४ सालीं छापून प्रसिद्ध केलें आहे. हे उत्तम कर्मनिष्ठ व भगवद्भक्त होते. ह्यांच्या वाणींतून सहजासहज वेदांत स्रवत असे. ह्यांनीं तनमनधनेंकरून परोपकाराची सीमाच करून सोडिली आहे; गोमंतकवासी यांच्या डोळ्यांसमोरील त्यांचें ध्येय कधीं जाणें शक्य नाहीं. हे अत्यंत निरिच्छ, निस्पृह व सत्यनिष्ठ होते. ह्यांस रोग ह्मणजे अंतसमयीं निवर्तण्याचाच झाला. आपण देह कशा रीतीनें व कोणत्यादिवशीं ठेवणार हें त्यांनीं पूर्वींच विवक्षित आप्तियांस सांगून ठेविलें होतें. अंतसमयीं वय ८६.



## (21) Shri Santaram Dada

Akkalkot (Late)

Born-1821 ] [ Died-1909.

Shri Santaram Dada was a resident of Akkalkot. He was the initiate of Shri Manik Prabhu Maharaj, an incarnation of of Shri Datta, well known at Humnabad Maniknagar. He had become a great Adhikari through the grace of Shri Manik Prabhu. He had realized the God within. By nature he was calm. He had many devotees at Bombay and other places. In 1908 he had put up in the Bungalow of Tukaram Tatya at Bandora. Shri Vagdeo Maharaj paid him a visit there at his desire. They had a talk and Shri Vagdeo Maharaj gave him his blessings. He was aged 89 years at demise.

—:0:—

## ( २१ ) श्रीसंतराम दादा, अक्कलकोट. ( गत. )

जन्म-शके १७४३. ] [ गत-शके १८३२.

हे अक्कलकोट येथें रहात असत. हे गृहस्थाश्रमी होते. हुमनाबाद माणिकनगर येथील सर्वत्र प्रसिद्ध झालेले **श्रीदत्तावतारी श्रीमाणिकप्रभू** महाराज ( या पुस्तकांत असलेले ) यांचे हे शिष्य होत. **श्रीप्रभूंच्या** पूर्ण कृपाप्रसादानें ह्यांच्या अंगीं थोर अधिकार आला होता. हे आत्मसाक्षात्कारी सत्पुरुष होते. वृत्ति फारच शांत. यांचा शिष्यसमुदाय बराच मोठा आहे. हे ता. ९ फेब्रुआरी सन १९०८ सालीं मुबंईत आले त्या वेळीं वांद्रें येथील पर. तुकाराम तात्या यांच्या बंगल्यांत उतरले होते. **श्रीसंतराम दादांच्या** इच्छेनुसार **श्रीसमर्थ वाग्देव** महाराजांनीं तेथें जाऊन त्यांस दर्शन दिलें. प्रेमातिरेकानें **श्रीसमर्थ वाग्देव** महाराजांबरोबर त्यांचें बोलणें झालें. त्या वेळीं **श्रीसमर्थ वाग्देव** महाराजांनीं आपले कृपाहस्त त्यांचे मस्तकावर ठेविले; त्यावेळचा प्रसंग संस्मरणीय होता. अंतसमयीं वय ८९.

—:0:—



## (22) Shri Ramana Maharshi

Arunagiri. (Living)
Dist. North Arcot
Born-1882

Shri Ramana Maharshi was born in the village of Tiruchchuzhi, in the district of Ramnad of the Madras Presidency His father, Brahma-Sri Sundaram Aiyar, was a well known pleader and consequently his family was in good circumstances. He was wellbuilt and fond of play He spent his boyhood in boyish sports and none could at that time, expect that a lad so full of vigour, so fond of sports and apparently so little drawn to religion, would become in time a great Maharshi who would stand as a guide to many a man seeking freedom from bondage.

In 1896 he was reading in the Matriculation class, but he showed indifference to his studies, as he was in a state of Dhyana-mental concentration towards Arunachala (mountain of knowledge), and he quitted his house and his near and dear ones in pursuit of Arunachala

He went to Shri Sundareswara Swami's temple in Madura &c. At present he is in the Temple of Arunachala at Tiruvanamalais.

## ( २२ ) **श्रीरमणमहर्षि,** अरुणागिरी, जि० उ० आर्काट. ( विद्यमान. )

जन्म-शके १८०२.

ह्यांची जन्मभूमि मद्रास इलाख्यांतील रामनाड जिल्ह्यांत तिरचेसी खेडेगांव होय ह्यांचा बाळपणीं फारच खेळाडू स्वभाव असून धर्माकडे अगदींच दुर्लक्ष होतें. अर्थात् पुढें हे एवढे अधिकारसंपन्न होऊन जगाला भक्तिमार्गाकडे वळवितील अशी कोणाचीहि कल्पना नव्हती. सन १८९६ सालांत हे म्याट्रिक्युलेशन वर्गांत होते. परंतु त्या वेळीं त्यांचें अरुणाचलाकडे लक्ष लागल्यानें आपल्या अभ्यासाकडे त्यांनीं अगदींच दुर्लक्ष केलें, व ह्याच कारणानें आपल्या जिवलग आप्तवर्गासहि तिलांजुलि दिली, व तेथून ते मदुरा येथील श्रीसुंदरेश्वराच्या देवालयांत गेले; वगैरे. प्रस्तुत हे तिरुवनमलयांतील श्रीअरुणाचलाच्या देवालयांत आहेत. ह्यांचें चरित्र कोणीं इंग्रजींत छापून प्रसिद्ध केलें आहे.



**(23) Shri Krishnananda,**
Yerala (Living)
Dist-Umraoti (Berar)
Born—A. D. 1839

This sage was born at "Vasavvat" in Nizam's Dominions After his thread ceremony he lost his parents; later on renunciation dawned on him and he proceeded with a pilgrim to Akkalkot Swamy Maharaj. His mind was drawn to spirituality. He stayed there for four years. (It was in his presence that Akkalkotmaharaj gave up his body). Then he came in contact with Shriman Jagadguru Shankaracharya of Shivganga muth by whom he got himself initiated in the order of Sannias. In three years he followed Danda Sannias, then for 6 years Tridandi Sannias and then took Parmahansa. He went on pilgrimage to 4 Dhamas. He stays in the muth erected outside the town. He has a large following of disciples. He has composed large number of poems in Marathi &c.

—:0:—

( २३ ) **श्रीकृष्णानंद परमहंस**, येरळा, जि० उमरावती. ( विद्यमान. )
जन्म-शके १७६०, कार्तिक शुद्ध २, शुक्रवार.

ह्यांचा जन्म निजामसरकारचे राज्यांत झाला. व्रतबंध झाल्यावर यांनां मातापित्यांचा वियोग झाला. आईबाप वारल्यावर वैराग्य प्राप्त होऊन एका प्रवाशाबरोबर हे अक्कलकोटचे स्वामीमहाराजांकडे निघून गेले, व तेथेंच चार वर्षें राहिले. ( ह्यांचे समक्ष श्रीअक्कलकोटचे स्वामी समाधिस्थ झाले आहेत. ) नंतर हे गोदावरीचे कांठीं 'नांदेड' येथें गेले. तेथें श्रीमत् शंकराचार्य शिवगंगामठाधिपति यांची गांठ पडली व त्यांचा अनुग्रह घेऊन संन्यासाश्रम घेतला. तीन वर्षें दंडसंन्यास, सहा वर्षें त्रिदंडी संन्यास करून नंतर परमहंसदीक्षा स्वीकारिली. हे गांवाबाहेर बांधलेल्या मठांत रहातात. शिष्यवृंद मोठा आहे. ह्यांनीं कविताही पुष्कळ केल्या आहेत.

—:0:—



**(24) Shri Narayan alias Shri Sitaram Maharaj.**

Savantwadi (Living)

Born-Friday 24 August.

This Saint belongs to Savantwadi, where he has his house, family &c. He is aged 19 years and has studied up to 4 standards in Marathi and 2nd standard in English. He was happy at home with plenty to eat and drink and playful in his early days. When in such a condition, on the 13th of April A. D. 1914 the Spirit of an ancestor by name Shri Sitaram who was a saint and said to be a contemporary of Shri Tukaram all at once pervaded his body and wrought a change in him. He related old reminiscences about Shri Sitaram Maharaj and began to perform Keertan, in course of which he composed hymns on the spot and expounded them. The thousands of hymns which found utterance in the flow of his heart during the Keertan have been recorded by the audience. In A. D. 1918 he went to Pandharpur &c. When he had been to Bombay many Keertans were performed there.

**श्रीनारायण** ऊर्फ **सीताराम महाराज.** सावंतवाडी. ( विद्यमान. )

जन्म-शके १८२२, श्रावण व० १४, भृगुवार.

यांचें मूळ नांव नारायण. हल्लीं वय १९ वर्षे. यांचा विद्याभ्यास फक्त मराठी ४ इयत्ता व इंग्रजी दोन इयत्तांपर्यंत झालेला आहे. बाळपणीं हे फार खेळाडू होते. अशा परिस्थितींत असतां यांच्या कुळांत पूर्वी ( श्रीतुकाराम महाराजांच्या समकालीन ) श्रीसीताराम महाराज या नांवाचे संत होऊन गेले होते. त्यांचा आवेश यांच्या देहांत शके १८३६ चैत्र व० ३, सोमवार रोजीं होऊन वृत्ति बदलली व आपण सीताराम असें सांगून त्यांच्या पूर्वीच्या खुणाहि सांगून एकदम दिव्य कीर्तन करूं लागले. कीर्तनप्रसंगीं हे तात्कालिक स्फूर्तीनें अभंग रचून त्यावर निरूपण करितात. शके १८३८ मध्यें सावंतवाडीहून बेळगांव, श्रीक्षेत्र नृसिंहवाडी, करवीर, पंढरपुर व श्रीनारायण महाराजांचें केडगांव वगैरे ठिकाणीं फिरून आपल्या अत्यंत प्रासादिक वाणीचीं विद्वानांस व स्वानुभवी साधुसंतमंडळीसही रिझविणारीं कीर्तनें करून परत गेले मुंबईतही कीर्तनें करून लोकांस या बालसंतानें साश्चर्य श्रद्धेंत पाडलें आहे. प्रस्तुत हे सावंतवाडी येथें असतात.



(25)

SHRI SHRINIVAS SWAMI,

*Coimbatore (Living).*

Brahma Shri Srinivasa Bhagavant Swami is a native of Coimbatore district, of respectable descent. Having finished his college career at Madras, he took to the study of philosophy and deeply impressed with the divine impulse he, at once, set out in search of a preceptor. Having traversed the many holy places with which South India is adorned, he was lucky enough to come across a Mahatma in the holy caves of Sëshachalam, and being a competent adhikari for divine initiation the Guru Maharaj blessed him with the solution to the riddle of the universe. Emancipated from the jarring conflicts of this world he in his illimitable love for the miserable masses took to preaching the love of God and redeemed the ignorant populace from a downward drift. &c.

---

(२५) श्री श्रीनिवास भगवंत स्वामी. कोईमतूर (विद्यमान.)

हे मूळचे कोईमतूरचे रहिवाशी असून चांगल्या घराण्यांत जन्मले आहेत. मद्रासेस कॉलेजांतील शिक्षण पुरें केल्यावर ह्यांनीं तत्वज्ञानाचा अभ्यास सुरू केला व अध्यात्मिक प्रेरणेनें गुरुशोधनार्थ दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व पवित्र तीर्थें व क्षेत्रें करित असतां त्यांच्या सुदैवानें एका अधिकारी महात्माची शेषाचल पर्वताच्या गुहेंत गांठ पडली. गुरुमहाराजांनीं आपल्या पवित्र व उज्ज्वल ज्ञानानें त्यांस मायारुपी जगताचें कोडें सोडवून दिलें. अमर्याद संसारिक दुःखांस न जुमानतां दुःखितां करितां त्यांचें अंतःकरण तिळतिळ तुटूं लागलें. व त्यांनीं ईश्वरविषयक प्रेमाचा प्रसार व्याख्यानद्वारा सुरू केला, आणि पुष्कळ अज्ञानी लोकांस विषयरुपी प्रवाहांत वाहून जात असतां त्यांतून बाहेर काढिलें. बेंगलूर येथें यांनीं 'भक्ति मार्ग सभा' स्थापन केली आहे.



**(26) SHRI SATCHIDANANDA SARASWATY,**

Bhavanagar.

(Deceased)

In his privious stage this saint was known as Gourishanker Udayashanker, C. S. I. chief Dewan of Bhavanagar State. After finishing his duties there, he took to Sanyas renunciation He was a very generous and liberal man and his charities were vast. His life of previous stage has been published. His grandson Haribha Vazeshankar Gavrishankaris at Presnt in Bombay.

**( २६ ) श्री सच्चिदानंद सरस्वति,** भावनगर ( गत )

हे पूर्वाश्रमांत भावनगर संस्थानचे मुख्य दिवाण होते, त्यांचें मूळ नांव गौरीशंकर उदयाशंकर असून त्यांस सी. एस. आय. हा किताब होता. त्यांनीं आपलीं संसारांतील कांहीं कर्तव्यें आटपून संन्यासाश्रम घेतला. हे फारच उदार मनाचे असल्यावरून त्यांच्याहातून पुष्कळ दानधर्म झालेला आहे, त्यांचें पूर्वाश्रमांतील चरित्र छापून प्रसिद्ध झालेलें आहे. प्रस्तुत त्यांचे नातु श्रीयुत हरीभाई वजेशंकर गौरीशंकर हे मुंबईंत असतात.



## (27) SHRI DEVANANDA,

Sindh (Living)

This sage has been practising Yoga since the last 15 years. His Holiness has reached a high pitch of spiritual perfection. He is an adept in the science of Yoga. He is well-versed in philosophy, psychology and occult sciences and has a good insight in the Vedas and Shastras. He is not only a scholar of Sanskrit but possesses an excellent knowledge of English. The holy object of the Yogiraja is to revive the practice of Yoga which is on the point of being extinct.



## (२७) श्री देवानंद महाराज, सिंध ( विद्यमान )

हे योगी गेल्या पंधरा वर्षांपासून योगाभ्यास करित असून अध्यात्मिक शास्त्रांत पूर्णावस्थेस पोंहोंचले आहेत. हे योगशास्त्रांत निष्णात आहेत. त्याचप्रमाणें तत्वज्ञान, मानसशास्त्र, वेद व शास्त्रें यांतही पूर्ण आहेत. संस्कृत भाषेचा मोठा व्यासंग असून इंग्रजीभाषेचें देखील त्यांस चांगलें ज्ञान आहे. सांप्रतकाळीं योग हा नष्ट झाल्यामुळें त्याचें पुनरुज्जीवन व्हावें असा त्यांचा स्तुत्य हेतु आहे.



( 28 )

## SHRI GOPAL KRISHNA MAHARAJ,

Mannigi (Late).

Born 1852] Died 1914.

From his childhood he was nurtured in godly and pious association. Every day early morning he would take his ablution, perform his sandhya, meditation, recitation etc. with concentrated mind and heart. After taking his meals he would attend his office. As he performed his duties assiduously even there, his superiors were pleased with him. On his return home (when at Belgaon, where he lived long up to his last) he would go to the temple of Maruti and spend some moments there in deep contemplation. On return home he would take again his evening bath, perform his devotions as in the morning, with the addition of devout Bhajan till midnight, Though he was a householder his people never interfered in his habits and left him all to himself. His tutelary Deity was Dattatraya whose hymns he chiefly song. In Him he attained realisation. His patience, equanimity of mind, and spirit of renunciation were exemplarary. Thus he has left behind many disciples who fondly cherish his memory.

## ( २८ ) श्रीगोपालकृष्ण महाराज, मण्णिगी. ( गत. )

जन्म शके १७७४ ] [ गत शके १८३६

बालपणापासूनच हे धार्मिक वातावरणांत व पवित्र सहवासांत वाढले गेले. दररोज प्रातःस्नान, संध्या, ध्यान, व पाठ हे त्यांजकडून एकचित्तानें होत असत. जेवल्यावर कचेरींत जात. कचेरींत स्वतःचें काम चोख करित गेल्यामुळें त्यांच्या वरिष्ठांचें त्यांजवर प्रेम जडलें. कचेरींतून घरीं येतानां श्रीमारुतीरायाचें दर्शन करून कांहीं वेळ देवळांत ध्यानस्थ बसत, व घरीं आल्यावर सायंस्नान करीत व प्रातःकर्माप्रमाणें सायंकर्म केल्यावर मध्यरात्रीपर्यंत भजन करित. हे जरी गृहस्थाश्रमी होते तरी त्यांच्या नित्य-कर्मांत त्यांच्या घरांतील माणसांनीं कसलाही अडथळा आणला नाहीं. श्रीदत्तात्रय हे ह्यांचीं आराध्य देवता होय. व ह्याच देवतेच्या भक्तीनें हे संसार तरले. त्यांचा सहन-शीलपणा, मनाची एकतानता, व वैराग्य हीं फारच अनुकरणीय होतीं. त्यांच्या मागें त्यांचा शिष्य संप्रदाय मोठा आहे.



(29)

## SHRI BASAPPA SWAMI

( Deceased )

Died on Wednesday the 20th June 1917.

This sage was born at Timapura in Gadag in the district of Dharwar. From his boyhood he spent fifteen years of his life in the service of his parents. Later on having given up all attachment to his relations he received the grace of famous saint Gaganacharya, and lived in his auspices for twenty years. During this time he was practising yoga. Though quite illiterate, he was taking unusual interest in hearing expositions of Vedanta and Puranas. He knew besides his mother-tongue Canarese, also Hindustani and Marathi. He was in the habit of hearing Panchadasi, Yogavasishata, Atmapuran and Bhagvadgita, that were being read. After he passed some years in the service of his Sadguru, he began to travel in different places of pilgrimage.

## (२९) श्री बसाप्पा स्वामी, वक्कुंद, ( जि. धारवाड ) समाधिस्थ.

समाधि- शके १८३९ आषाढ शु० १ बुधवार

धारवाड जिल्ह्यांतील ( गदग ) तिमापूर या गांवीं यांचा जन्म झाला. बालपणीं यांनीं आपल्या वडिलांच्या सेवेंत पंधरा वर्षें घालविलीं. पंधराव्या वर्षीच यांनीं संसार त्याग केला. यांनीं प्रसिद्ध **संत गगनाचार्य** यांचा अनुग्रह घेतला, व त्यांच्या समागमांत हे वीस वर्षें राहून त्यांतच त्यांनीं योगाभ्यास केला. यांस लिहितां वाचतां येत नव्हतें, तरी वेदांत पुराण श्रवणाकडे फारच आवड होती. यांस हिंदुस्थानी, कानडी, मराठी भाषा येत होत्या. व त्या त्या भाषांतील पंचदशी, योगवासीष्ट, आत्मपुराण भगवद्गीता, यांचें श्रवण करीत होते. श्रीसद्गुरु सेवेंत राहून झाल्यावर यांनीं तीर्थक्षेत्रे करण्यास प्रारंभ केला. काशी क्षेत्रीं पंधरावर्षें राहून उत्तर हिंदुस्थानांतील यात्रा केल्या, आणि वक्कुंद मुक्कामीं आले. तेथें २५ वर्षें होते. नंतर परत दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व यात्रा करण्यांत पांच वर्षें घालविलीं व वक्कुंदास आले. तेथें चारवर्षें होते. यानीं सदर रोजीं श्रीहरिचिंतनानें आपला पुण्य देह ठेविला.



## (30) SHRI NADKARNI ALIAS DAJI MAHARAJ.

Shivadav (Living)

*Shivadav-Savantavadi.*

He was formerly a householder and a highly salaried official in the Customs Department, Bombay. He had nearly completed service for pension. By divine grace renunciation dawned on him and he resigned his service. He is a worshipper of Dattatraya. By nature he is good and quiet. He is a good guide to the aspirants on the spiritual path. He is devoting his time to divine meditation and Bhajan. He is going about from place to place and has a large following of diseiples. His disciples have by their efforts earned for him pension for his services.

**( ३० ) श्री दाजी महाराज,** शिवडाव, सं. सावंतवाडी ( विद्यमान )-

हे पूर्वी गृहस्थाश्रमी होते. मुंबईत कष्टममध्यें चांगलेच पगारदार नोकर होते. जवळजवळ भर पेन्शन मिळण्या एवढी यांची सरकारी नोकरी झाली होती. ईश्वरी संकेतानुसार त्यांस वैराग्य वृत्ति प्राप्त होऊन यांनीं नोकरीस राजीनामा दिला. हे दत्तोपासक आहेत सुस्वभावी, शांतवृत्तीचे असून साधकांस उत्तम परमार्थ मार्ग दर्शक आहत. ईश्वर चिंतनांत व भजनानंदांत काळ घालवित असतात. हे गांवोगांव फिरत असतात. यांचा भक्तवृंदही बराच आहे. ह्यांच्या शिष्य वर्गानें खटपट करून झालेल्या नोकरीबद्दल सरकारांतून पेन्शन मिळविले आहे. त्याचा योग्य व्यय होत असतो.



(31)

**SHRI RAMCHANDRA MAHARAJ, Tikote.**

*(Deceased).*

This sage was a householder and Raja-yogin. He had a large following of disciples. He resided at a village named Tikote, in the State of Kurundawadi, where he was placed by the Chief of the said State Shrimanta Dada Saheb Patavardhan since he received initiation from the sage. The renowned H. Bh. P. Baba Garde, author of "Gitamrit shatapadi", "Gitapanchadasi" etc. and other Vedantic works is his disciple. Even in the city of Bombay he has large number of disciples. Srimat Paramahamsa Madhavendra Swami of the lineage of Sri Hariharendra Swami is also a devotee of this sage. His samadhi is at Bijapur at a distance of 12 miles fram Tikote.

**(३१) श्री रामचंद्र महाराज तिकोटेकर,** तिकोटे (समाधिस्थ) जि. विजापूर.

हे गृहस्थाश्रमी असून राजयोगी होते. यांची शिष्य शाखा बरीच मोठी आहे. कुरुंदवाडचे संस्थानिक **श्रीमंत दादासाहेब पटवर्धन** यांनीं यांचा अनुग्रह घेतल्यापासून त्यांच्या इलाख्यापैकीं तिकोटें नांवाच्या गांवांत हे रहात होते. हे मोठे अधिकारी सत्पुरुष होते. गीतामृतशतपदी, गीतपंचदशी इत्यादि वेदांत ग्रंथांचे कर्ते सुप्रसिद्ध ह. भ. प. **बाबा गर्दे** हे यांचे शिष्य होत. आळंदी येथील **श्रीहरिहरेंद्र** स्वामीच्या परंपरेंतील गादीवर असलेले ब्रह्मीभूत श्रीमत् परमहंस **माधवेंद्रस्वामी** हेही यांचे शिष्य होते. त्याचप्रमाणें मुंबई शहरांत व गांवोगावीं यांचा शिष्यसमाज बराच फैलावला आहे. यांची समाधी विजापूर येथें आहे.



(32)

**SHRI SAYYAD RASUL**

Bagalkot, (Living)

This sage has been living for many years at Bagalkot, near Bijapur, where he is highly celebrated, and has been gracious to many devotees. He is said to have been a great adept in his preceding birth. He would not divulge his end to anybody. Being self-willed, he had left Bagalkot some years ago and travelled in Mysore, Ujjain and other places, It is not possible to give a definite account of this sage. He appears to be about 70 Years of age.



(३२) **श्री सय्यद रसूल,** बागलकोट, जि. विजापूर ( विद्यमान )

बागलकोट गांवीं हे बरींच वर्षें राहिले होते. तेथें ह्यांची फार ख्याती आहे. पुष्कळ भक्त मंडळीस ह्यांचे अनुभव साक्षात्कार आहेत. हे आत्मसाक्षात्कारी सिद्ध पुरुष आहेत. आपली ओळख कोणालाही लागूं देत नाहींत. हे स्वेच्छाचारी असल्यामुळें कांहीं वर्षांपूर्वी बागलकोटांतून अकस्मात नाहींसे झाले. हे उज्जनी, ह्मसूर वगैरे प्रांतीं गेले आहेत असें ऐकिवांत येतें. ह्यांचा सविस्तर वृत्तांत मिळण्याचा मार्ग नाहीं. वय वर्षें ७०.



### (33) SHRI KHALAMMA BHUSAVAL

( *Living.* )

This w man is of advanced age. She stays at a very short distance from Bhusaval station in an open place where she has continually been exposed to rains as well as hot Sun for a number of years. Wor·ings of her divine power are many. Consequently, even people of higher clases go to visit her. An officer had recently come over to Bhusaval who was impressed about her condition. In order to secure her comforts he arranged for her removal to Bhusaval without obtaining her permission and kept her there. Then the officer had a severe attack of stomachache, which never yielded to medicine althou·h plenty of it was tried. &c.

### (३३) श्रीखालाम्मा, भुसावळ. ( विद्यमान. )

ही बाई प्रौढवयाची आहे. भुसावळ स्टेशनापासून अगदींच थोडक्या अंतरावर एका उघड्या जागेवर केक वर्षे रहात आहे. पाऊस उन्ह असलें तरी ती तेथेंच असते. ही बाई पूर्ण तेज संपन्न असून हिचा अधिकार अवर्णनीय आहे. उत्तर प्रत्योत्तर करित नाहीं. मनांस वाटेल तें बोलत असते. हिचे साक्षात्कार पुष्कळ होत असतात. याकरितां हिच्या दर्शनार्थ उंच उंच वर्णाची मंडळी जात असते. हल्लीं एक कामदार भुसावळ येथें आले होते, त्यांनीं हिची स्थिति पाहून व्यवस्था नीट लावावी म्हणून बाईची परवानगी घेतल्यावांचूनच तिला गावांत नेऊन ठेविली. चमत्कार असा घडला कीं, त्या कामदाराच्या पोटांत अकस्मात शूळ उद्भवून फार दुखूं लागलें. औषधोपचार पुष्कळ केले परंतु पोटशूळ थांबेना: अखेरीस कोणी एकानें त्यांस सूचना केली कीं, त्या बाईस पुन्हां आणून जागच्या जागीं ठेवून पहा. तेव्हां तिला आणून पूर्वस्थळीं ठेविली त्यावेळीं त्यांचा पोटशूळ एकदम नाहींसा झाला. वय वर्षे ७०.



( 34 )

**SHRI RAMA PARAMAHAMSA ( Living ) Sajapur Malwa.**

This sage simply repeats Ramanam when he is asked information abont his native place &c. He is called Rama Paramahamsa on account of his constantly repeating Ramanam. In about 15 years he has not been taking food other than 1/4 seer of milk, morning and evening. He uses ganja now and then and in that respect he has no system. When bathing he ties cloth to his mouth, lest water should get into it. As he has abstained from food he has lost both his eyes and he is reduced to a mere skeleton. Devotees carry him in a Dooly when going beyond the town. Being superconscious he comprehends the object of his devout visitors and turning his face towards them he sings in Rangadi language thereby making them understand his meaning.

( ३४ ) **श्रीराम परमहंस**, साजापूर ( विद्यमान. )

ह्यांचें मूळगांव वगैरे माहित नाहीं, विचारिल्यास राम नामावांचून कांहींच बोलत नाहींत. रामनामोच्चार व परमहंस दीक्षा असल्यामुळें 'रामपरमहंस' हें नांव पडलें आहे. सरासरी १५ वर्षांपासून यांनीं अन्नपाणी सेवन केलें नाहीं. सकाळ संध्याकाळ फक्त पावशेर दूध पितात. गांजा मात्र वरचेवर पाहिजे पण त्याचाही नियम नाहीं. मुखांत पाणी जाऊं नये ह्मणून मुखास फडका बांधून स्नान करितात. अन्नपाणी वर्ज केल्यामुळें ह्यांचे दोन्ही नेत्र गेले असून केवळ अस्थि चर्म मात्र राहिलें आहे. भक्त लोक डोलींतून ह्यांस गांवीं नेत असतात. हे अंतर्साक्षी असल्यावरून दर्शनास आलेल्या भक्त मंडळीच्या मनांतील हेतूला अनुसरून स्वतःचीं बोटें डोळ्याजवळ नेऊन त्यांच्याकडे मुख फिरवून गात गात रांगडी भाषेंत बोलतात तेणे करून त्यांस खूण पटते.



**(35) SHRI VITHAL BUVA**

(Living) **Vadgam,**

**Dt. Satara.**

*Born—1821.*

The age of this saint is about 97 years now. Yet his bodily con titution is strong and healthy. He was to succeed to the "Bramhachari Gadhi" of the well-known Jayaram Swami of Vadgam. But of late he raised a Bramhachari disciple on that Gadhi and himself proceeded on pilgrimage to Sacred Places and Teerthas. He is an able astrologer. At Ratnagiri he has raised a temple of Duttatraya. He is a Saint worthy of visit and full of renunciation. He has a good number of disciples in Bombay. In 1917 he had once come over to Bombay.

( ३५ ) **श्रीविठ्ठल बुवा,** वडगांव, जि० सातारा–( विद्यमान ).

[ जन्म शके १७४३. ]

आज मितीस ह्यांचें वय ९७ वर्षांचें आहे, तरी ह्यांच्या शरीराचा बांधा सुदृढ असून ते निरोगी आहेत. हे प्रसिद्ध जयरामस्वामी वडगांवकर यांच्या ब्रह्मचारी गादीचे अधिकारी होते. अलीकडे त्या गादीवर यांनीं ब्रह्मचारी शिष्याची स्थापना करून आपण तीर्थ क्षेत्रें करण्यास निघाले आहेत. हे पत्रिका फार उत्तम पहातात. रत्नागिरी येथें यांनीं श्रीदत्त मंदिर बांधलें आहे. हे अधिकारी दर्शनीय सत्पुरुष आहेत. ह्यांचा मुंबईत भक्तसमाज पुष्कळ आहे. शके १८३९ भाद्रपद महिन्यांत हे मुंबईस आले होते. माहुली येथें कृष्णेच्या तीरावर ह्यांचा समाधि घेण्याचा विचार ठरला आहे.



(36)

## SHRI MADHAVENDRA

(Late) Alandi, Dt. Poona.

*Born—17th February 1852.*

Kirlos ( his native place ) is situated on the bank of the Vedaganga in Malwan Taluk, Ratnagiri Dt. From boyhood he was devoted to God. After his marriage he served for 10 years in Karhad Court. He had 3 Children. He was then serving in the Mamlatdar's office in Koregaon in Satara Dt. There he had a vision of Shri Dattatraya, where upon he gave up the service, went round to places of pilgrimage and at Nigadi got himself initiated in the Dutta Sampradaya system of devotion. At Gangapur he performed 3 Saptahas. There, in a vision he was told that he would soon find the Sadguru, who would liberate him from births and deaths. &c.

## ( ३६ ) **श्री परमहंस माधवेंद्र स्वामी**, आळंदी, ( ब्रह्मीभूत ).

[ जन्म-शके १७७३ माघ कृष्ण १३ मंगळवार ] आळंदी-जि० पुणें.

ह्यांचें रत्नागिरी जिल्ह्यांत मालवण तालुक्यांत वेदगंगा कांठीं किर्लोस गांव होय. बालपणापासून हे ईश्वरभक्त होते. **ह्यांनीं** विवाहानंतर कऱ्हाड कोर्टांत दहा वर्षें नोकरी केली. ह्यांस तीन मुलें झालीं त्या वेळीं सातारा जिल्ह्यांतील कोरेगांव मामलेदार कचेरींत नोकर होते. तेथें ह्यांना श्रीदत्ताचा दृष्टांत झाला व नोकरी सोडली. पुष्कळ तीर्थ क्षेत्रें हिंडून निगडी येथें दत्तसांप्रदायाचा अनुग्रह घेतला. गाणगापुरीं सात दिवसांच्या सप्ताहाचीं तीन पारायणें केलीं, तेथें त्यांस दृष्टांत झाला कीं, "तुला जन्म मरणांतून मुक्त करणारे सद्गुरू लवकरच भेटतील" नंतर घरीं आले. पुढें फिरत फिरत कोल्हापुरास गेले, तेथें श्री त्रिकूटवासी रामनाथ यांची भेट झाली व त्यांस बोधामृत पाजून मनोरथ पूर्ण केला. ह्यांनीं सद्गुरु सेवा एक तप केलेली आहे.



( 37 )

**SHRI BALKRISHNA BUVA,**

CHAUNDE, Waee Dt. Satara.

*( Living. )*

Born-31-1-1877.

His birth place is Waee. From his childhood he was devoted to the love of God. He performed Kirtan, when he was twelve years old. He followed this line till he reached his twentieth year. Then his intense desire led him to Sajjangad, where he expressed his wish to the wife of Shri Maharudra Swami Maharaj to initiate himself into the Parampara of Ramdas Swami. The pious lady then took him to the Samadhi of Shri Ramdas Swami and asked him to read the character engraved on the Samadhi. The characters were no other than the Trayodashakshari Mantra of Shri Ramdas Swami. He accepted with greatest respect the Mantra and in this way became the disciple of Shri Ramdas Swami. This saint has been leading his pious life in devoting it wholly to the cause of cow protection. His life sketch will be found in the "Real Cow Protection", published in Marathi.

**( ३७ ) श्री बाळकृष्ण बुवा चौंडे**, वांई ( विद्यमान ).

जन्म शके १७९८ माघ कृ० २.

ह्यांचा जन्म वांई येथें झाला, अगदीं बाळपणापासून ह्यांस ईश्वर भक्तीचा फारच नाद असे. ह्यांनीं वयाच्या बाराव्या वर्षीं कीर्तन केलें आहे. कीर्तनाचा व्यासंग वयाच्या १८-२० व्या वर्षांपर्यंत चालला; पुढें आपल्या उत्कट इच्छेनुसार शके १८२० सालीं सज्जन गडावर जाऊन समर्थांच्या सातव्या पीढीचे श्रीमहारुद्र स्वामी महाराज यांच्या कुटुंबाचें दर्शन घेऊन आपला मनोदय कळविला. उपदेश देण्याचा आपला अधिकार नाहीं असें बाईकडून उत्तर मिळालें. परंतु ह्यांची दृढ श्रद्धा जाणून त्यांस समाधीकडे नेऊन समाधीवरील अक्षरें वाचण्यास लाविलीं. तेंव्हा त्रयोदशाक्षरी महामंत्र दिसला, तो त्यांनीं ग्रहण करून श्रीसमर्थ सांप्रदाय स्विकारिला आहे. प्रस्तुत हे गोरक्षण कार्जी आपला पुण्य देह झिजवित आहेत, हें जाहिर आहेच. 'खरें गोरक्षण' ह्या पुस्तकांत ह्यांचे जीवन चरित्र प्रसिद्ध झालें आहे.



(38)

**SHRI DHONDI BUVA ALIAS DADA MAHARAJ,**

*Satara (Living),*

This saint is a householder residing in satara. He is a close votary of Jnaneshwar Maharaj and excellently discourses on the spirit of the texts of the "Jnaneshwari." Being full of love his discourses create deep impression on the minds of his hearers. He is also an excellent Keertankar. When at Bombay, he stays atthe house of Dr. Vamanrao Krishnanath Dhurandhar, a godly man of this place. He has a large following in Bombay.

**( ३८ ) श्री धोंडीबुवा उर्फ दादा महाराज**, सातारा ( विद्यमान )

हे गृहस्थाश्रमी असून साताऱ्यांत रहाणार आहेत. हे ज्ञानेश्वर महाराजांचे परमभक्त असून ज्ञानेश्वरीग्रंथाचें निरूपण फारच उत्कृष्ट व मार्मिकपणें सांगत असतात. हे अत्यंत प्रेमळ असल्यावरून श्रोतृसमाजाच्या हृत्पटलावर निरूपणाचा उत्तम बोध होत असतो. तसेच हे उत्तम कीर्तनकार आहेत. मुंबईत आल्यावर त्यांचा मुक्काम येथील आमचे सुहृद मित्र श्रीपांडुरंगभक्त श्रीयुत डा. वामनराव कृष्णनाथ धुरंधर या सद्भक्ताच्या येथें होत असतो. मुंबईत त्यांचा भक्त समाजही बराच मोठा आहे.



( 39 )

## SHRI SOMAYYA NARAYAN.

Madura-Shetubandha Rameshwar

( *Living* ).

This saint is well versed in yoga practice. He remains for days together in a locked room withont food and drink. He has a very good knowledge of Sanskrit, and is of a peaceful and gentle disposition. There is a peculiar brightness or halo about his appearance and supreme blissfulness in his mental attitude. He is quite famous in Madura. By imparting divine knowledge to the devout aspirants he helps them to make their onward path easier. He has a large following of deciples.

## ( ३९ ) श्री सोमय्या नारायण परमहंस, मदुरा, ( विद्यमान )

[ सेतुबंध रामेश्वर नजीक. ]

हे योग साधनांत पूर्ण निष्णात आहेत. अन्नपाण्यावांचून कुलूप लावलेल्या खोलींत हे पुष्कळ दिवस राहतात. ह्यांस संस्कृत भाषेचें ज्ञान फारच उत्तम आहे. अत्यंत शांत वृत्ति असून समाधानी आहेत. ह्यांच्या देहाकडे पाहिलें असतां विलक्षण तेजसंपन्न दिसून मनाची वृत्ती आनंदीत होते. मदुरा गांवीं ह्यांची फारच प्रसिद्धी आहे. भक्तमंडळीस सद्बोध देऊन परमेश्वर प्राप्तीचा मार्ग सुलभ करून दाखवितात. ह्यांचा शिष्य समुदाय बराच मोठा आहे.



( 40 )

**SHRI NITYANANDA SWAMI,**

*Shrinagar ( Living. )*

His birth place is Shrinagar. He is a perfect adept in Ashtanga Yoga, is quite unattached, free from desires and selfguided. He occasionally visits Bombay, where he has a large number of devotees. He does not stay long, when he finds heople are drawn to him largely, which shows that he does not wish for fame or to be known. Being selfguided his movements are directed to where his mind goes. shivakanchi is the place of his guru, which he often visits. Madras and other places are also often visited by him. His disciples have observed unintentional workings of miracles by his Yoga powers. This Yogi-Purush has been adorable by his good nature-Age about 50 Years.

( ४० ) **श्री नित्यानंद स्वामी,** श्रीनगर ( विद्यमान )

ह्यांची जन्मभूमी श्रीनगर. हे अष्टांग योग ज्ञानांत पूर्ण पारंगत असून अत्यंत निस्पृह, निरिच्छ, स्वेच्छाचारी आहेत. हे मुंबईत कधीं तरी येत असतात. मुंबईत ह्यांचा भक्त समाज बराच आहे, हे आपला पत्ता कोणालाही लागूं देत नाहींत. लोकांची फार गर्दी व्हावयाला लागली कीं फार वस्ती करीत नसतात. आपली प्रसिद्धी व्हावी अशी ह्यांना इच्छा नाहीं असें दिसतें. हे स्वेच्छाचारी असल्यामुळें ह्यांचा संचार मनाची वृत्ति वळेल तेथें होत असतो. ह्यांचें गुरुस्थान शिवकांची येथें आहे. व तेथें हे बहुतकरून जात असतात. मद्रास वगैरे ठिकाणीं यांचें जाणें येणें पुष्कळ आहे. योगसाधनद्वारें यांजकडून सहजासहज पुष्कळ चमत्कार भक्तमंडळीच्या अनुभवास आलेले आहेत. हे योगी सत्पुरुष आपल्या स्वभावगुणानें सर्वांस वंदनीय झालेले आहेत. वय अजमासें ५०.



(41)

**SHRI UPASANI MAHARAJ, Sakori,**

*( Living. )*

SAKORI, NEAR SHIRDI ( G. I. P. R. ).

This Saint was formerly a learned man of a happy household. One day he went to Shirdi on a visit to Shri Sanyec Baba Maharaj. By divine will, the gracious blessings of the Sanyee Baba brought about a change in his previous condition near Shirdi in Sakori village. He is now in Superconscious state as is seen in the photo. Formerly he did not speak to any one but now he speaks well. Number of people go to visit him. He has his relatives and his brother now is professor in a Poona College.



**श्री उपासनी महाराज**, साकोरी ( विद्यमान )

साकोरी–शिर्डी नजीक ( जी. आय्. पी. रे. )

हे पूर्वी विद्वान घराण्यापैकीं असून विद्वान व घरचे सुखी होते. एक वेळ हे शिर्डी येथें **श्री सांईबावांच्या** दर्शनार्थ गेले, त्या वेळीं ईश्वरी योगानें व संत **सांईबावां**-च्या कृपाप्रसादानें ह्यांच्या पूर्वस्थितींत एकदम रुपांतर झालें. प्रस्तुत हे शिर्डी नजीक साकोरी गांवीं फोटोंत असल्याप्रमाणें विदेह स्थितींत असतात. हे पूर्वी लोकांजवळ बिलकूल बोलत नसून अंगावर दगडही मारीत असत परंतु, आतां हे बोलत आहेत व प्रश्नोत्तरही देतात. प्रस्तुत ह्यांचे बंधु श्रीयुत उपासनी हे पुणें येथें एका कालेजांत प्रोफेसर आहेत.



## (42) SHRI KESHAVANAND SARASWATI, Chipploon.

*( Living ).*

Born 13 February 1875 Saturday.

At present his father and other members of his family are at Chiploon. By God's grace his attention turned from the mundane to the divine. He went round on a pilgrimage, proceeded to the Himalayas, practised Yoga and acquired supernatural powers. He worked miracles in Bombay before large assemblies, gave "Mala" (rosary) idol of Ganapathi, Cocoanut, &c. to different persons and roused their admiration. At present he has given up miracle working and lives blissful in the bliss of Bhajan. Behind the temple of Mahalaxmi in Bombay on the shore of Maha-Samudra a small house has been built for him by his disciples. There he stays and devotees and disciples assemble in large numbers there. He is full of renunciation and blissfulness.

---

## ( ४२ ) श्री केशवानंद सरस्वति, महालक्ष्मी--मुंबई ( विद्यमान. )

जन्म-शके १७९६ माघ शु० ८.

प्रस्तुत चिपळूण येथें ह्यांचे वडील वगैरे मनुष्यें आहेत. ह्यांस ईश्वरी योगा योगानें कांहीं उपरती होऊन घर वर्ज झालें. पुढें यानीं सर्व तीर्थें क्षेत्रें केलीं. हिमालयावर जाऊन तेथें योग साधन केलें. तणेंकरून ह्यांस सिद्धी प्राप्त झाली. त्या सिद्धीच्या बलानें ह्यांनीं मुंबईंतील बड्या बड्या मंडळीस चमत्कार करून दाखवावे व कोणास माळ, कोणास गणपतीची मूर्ति, कोणास नारळ, सुपारी वगैरे वस्तु देऊन थक्क करावें. प्रस्तुत यांनीं सिद्धीचे चमत्कार दाखविणेचें अजिबात सोडून देऊन हे भजनानंदांत निमग्न असतात. मुंबईंतील श्री महालक्ष्मीच्या देवालयाच्या पाठी मागें महासुद्राच्या किनाऱ्यावर त्यांच्या शिष्यवर्गानें ह्यांस लहानसा आश्रम बांधून दिला आहे, त्यांत असतात. तेथें भजनार्थ रोज भक्त-मंडळीची गर्दी बरीच मोठी जमते. हे अत्यंत प्रेमळ असून वैराग्यपूर्ण आहेत.



## [43] SHRI VISHNUBOA JOG

*Poona, ( Late )*

Died 5-2-1920.

He was well-known all over Poona, being a regular pilgrim to Alandi. All pilgrims had a devout love towards him as he used to perform kirtan which was the best of its kind. It was full of love and devotion to God. He expounded Jnaneshwari so ably that he was considered the best and the ablest man on the subject. He was impartial and void of desire and was also a gymnast. He had fair knowledge of medicine and astrology. Having collected twenty thousand Rupees, he has established one educational institution for the welfare of the Warkaris at Alandi. His pilgrimage to Nasik, Trimbak and Pandharpur, induced many People to Bhakti by his kirtan Performances. He has edited with notes the Poems of Tukaram, Amritanubhav, Hari Patha and Changadeva Pasasti. He was bachelor till his last.

---

## ( ४३ ) **श्रीविष्णुबोवा जोग,** पुणें ( गत ) निर्याण--शके १८४१ माघ व० १

पुण्यांतील श्रीविष्णुबोवा जोग हे सर्वत्र सुप्रसिद्ध होतेच. हे आळंदीचे वारकरी होते. हे वारकरीपंथाचे असल्या कारणानें समस्त वारकरी मंडळास अत्यंत प्रिय झाले होते. हे वारकरी पंथाचें प्रेम भक्तीनें ओथंबलेलें सर्वोत्कृष्ट कीर्तन करीत असत. तसेंच ज्ञानेश्वरीचें उत्तम निरूपण सांगत असत. वारकरी मंडळांत हे एक वजनदार सत्पुरुष शोभत असत. हे निस्पृह, निरिच्छ, व अत्यंत प्रेमळ होते. ह्यांनीं तालमीचाही उत्तम अभ्यास केला होता. तसेंच यानां वैद्यकी व जोतीषही येत असे. यांनीं वारकऱ्यांच्या शिक्षणाप्रीत्यर्थ आळंदी येथें शिक्षण संस्था स्थापिली आहे. ह्यांनीं पंढरी, देहूं, आळंदी, त्रिंबक येथील वाऱ्या करून कीर्तनद्वारा हजारों लोकांस भक्तिमार्गास लाविलें. ह्यांनीं श्रीतुकारामाचा समग्र गाथा, अमृतानुभव, हरिपाट व चांगदेवपासष्टी हे ग्रंथ अर्थासह छापले आहेत. हे बालब्रह्मचारी होते.



(44)

**SHRI HARIDAS RAMDAS SARMA.**(*Living.*) SHIRALI N. C.



Haridas Ramdas Sarma born at Shirali North Canara. He is a ancestral devotee of Shri Rama, whose Jayanti he celebrates annually with great devotion during that he sings poems of Raghavadas the founder of Haridas matt. He celebrates also Shri Krishna Jayanti Saptaha by singing the poems of Ramavallabha. Ramdas is a bachelor. He has a good voice and sings most charmingly. He lives in monastery near the Samadhi of Raghavadas and a few of his disciples.



( ४४ ) **श्री हरिदास रामदास,** शिराळी, उ. कानडा ( विद्यमान )

ह्यांचा जन्म उत्तर कानड्यांत शिराळी गांवीं झाला. हे एकनिष्ठ रामोपासक भक्त असून बाल ब्रह्मचारी आहेत. श्रीरामजयंतीचा उत्साह मोठ्या समारंभानें प्रति वर्षी करीत असतात. त्यावेळीं श्री हरिदास मठाचे स्थापक श्री राघवदास यांनीं केलेल्या कविता ह्मणतात. आणि श्रीकृष्ण जयंतीचा सप्ताहही करितात. यांचा कंठ फार मधूर असून मनमोहक आहे. हे व यांचे कांहीं शिष्य राघवदासाच्या समाधी जवळ असलेल्या मठांत राहतात. हे अत्यंत प्रेमळ व सदानंदी सत्पुरुष आहेत.



**(45) Shri Sitaram Maharaj,**

Hoshangabad, ( Late )

This Saint is the youngest brother of the well known Sanyasi **Shri Vasudevananda Saraswati.** He lead a bachelor life. He has composed many poems on Vedant and Bhakti. Some of his poems have been published. He left a large number of followers behind him. He died at Hoshangabad where, it is heard, is erected a Samadhi.

—:0:—

( ४५ ) **श्रीसीतारामहाराज,** हुशंगाबाद ( ब्रह्मीभूत ).

हे प्रसिद्ध **श्रीवासुदेवानंद सरस्वति टेंब्येमहाराज** यांचे कनिष्ठ बंधु होत. हे बालब्रह्मचारी असून अधिकारी सत्पुरुष होते. यांनीं वेदांतविषयावर व भक्तिविषयावर पुष्कळ काव्यें रचलेलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं पदें प्रसिद्धहि झालीं आहेत. त्यांची शिष्यशाखाहि बरीच आहे. त्यांनीं हुशंगाबाद, खरा घाट ( नर्मदा ) येथें देह ठेविला. तेथें त्यांची समाधि बांधली आहे असें समजतें.

—:0:—



**(46) Shri Satchidananda Maharaj,**

Hubli (Living.)

This Saint being a householder is a disciple of the well known Gondavalekar Maharaj. His secret of life is the Trayodashakshari Mantra. He has fully studied Yogavashishta and delivers lectures excellently on the subject. Many devotees go to hear his preaching every day. He has composed in Sanskrit verses the lives of Ramdas and Eknath and they are very much liked by the audience. He has a large number of followers.

( ४६ ) **श्रीसच्चिदानंदमहाराज,** हुबळी ( विद्यमान ).

**जन्म**—आश्विन शु० ९, पिंगल संवत्सर.

हे गृहस्थाश्रमी असून प्रसिद्ध संत श्रीब्रह्मचैतन्यमहाराज गोंदवलेकर यांचे शिष्य आहेत. यांचा त्रयोदशाक्षरी मंत्र आहे. यांनीं योगवसिष्ठाचें ग्रंथावलोकन उत्तम केलें असून ह्यांची पुराण सांगण्याची शैली अप्रतिम आहे. पुराणश्रवणार्थ दररोज भक्तमंडळीचा जमाव फार मोठा होत असतो. यांची शिष्यमंडळीहि बरीच आहे. श्रीरामदास व एकनाथ ह्या संतांचीं आख्यानें संस्कृत पद्यरचनेंत फार सुंदर रचिलीं आहेत.

—:0:—



**(47) Shri Krishna Kadam,**
**Aundh, (Late).**

Born. 1847] [Died 1912

His father having repented for giving his first son in adoption, one day dreamt that Shri Rama had placed sweetmeat in his hand. When he awoke, he saw to his amazement that his hand was full of sweetmeat. Shri Krishna Kadam was born to him by the grace of Shri Rama. He showed tendency to devotion towards god from his childhood. He served for twenty-five years in the State of Aundh and the Chief of Aundh was as kind to him as he was to his son. His first wife having died, he married again and was then father of two sons and four daughters. Once he saw Shri Eknath Swami in his dream advising him to compose poems which inspired him to give out pourings of verses full of devotion. He has written some 19 books on Vedanta and other religious matters. His Guru was Shri Junglibuwa, whose Samadhi is at Bamburda, near Poona

**श्रीकृष्ण कदम, औंध ( गत ).**

( ४७ ) जन्म शके–१७६२ आश्विन शु. ११ ] [ गत शके–१८३४ कार्तिक व. २.

यांच्या वडिलांस प्रथम पुत्र झाला तो त्यांनीं दत्तक दिला. दत्तक दिल्यावर त्यांस फार पश्चात्ताप झाला. एक रोज श्रीराम स्वप्नांत येऊन त्यांच्या हातीं पेढा दिला. जागृतींत पहातात तों हातांत खराच पेढा आहे. त्या श्रीरामप्रसादानेंच हे कृष्ण कदम जन्मले. यांची बालपणापासून ईश्वरचरणीं पूर्ण निष्ठा होती. औंध सरकारकडे त्यांनीं २५ वर्षें नोकरी केली, व त्यांनीं यांस पुत्राप्रमाणें वागविलें. प्रथम कुटुंब निवर्तल्यावर यांनीं दुसरें लग्न केलें. दुसऱ्या कुटुंबाला दोन पुत्र व चार कन्या झाल्या. एक वेळ श्रीएकनाथ बालरूपानें ह्यांच्या स्वप्नांत येऊन कवित्व करण्यास यांना सांगितलें. तेव्हांपासून यांजकडून प्रासादिक कविता होऊं लागल्या. यांचे वेदांतपर वगैरे लहानमोठे १९ ग्रंथ आहेत. यांचे गुरु श्रीजंगलीबोवा हे होत. जंगलीबुवांची समाधि पुण्याजवळ बांबुर्डें येथें आहे.



**(48) Shri Damodarbuva Ramdasi,** Kuroli, Dist. Satara (Living)

This Saint is a disciple of Shri Gondavalkar Maharaj. He generally resides at Kuroli, where he has erected a temple of Shri Rama. He is a devotee of Shri Rama and explains Dasabodha excellently. He is well-known in Satara, Poona, Pandharpur, Sangli & Kuroli. His singing songs of devotion are full of love towards God. He has also erected a temple of Shri Rama at Gomewadi. He celebrates Ramanavami and Hanuman Jayanti with grandeur, and these celebrations are worth seeing. He is a saint worthy of being seen.

**( ४८ ) श्रीदामोदरबुवा रामदासी,** कुरोली ( विद्यमान ).

कुरोली जि० सातारा.

हे **श्रीगोंदवलेकर** महाराजांचे शिष्य आहेत. हे बहुतकरून कुरोलीसच असतात. तेथें त्यांनीं एक **श्रीराममंदिर** स्थापन केलें आहे. हे निःसीम **श्रीरामभक्त** असून **दासबोध** फारच उत्तम सांगतात. सातारा, पुणें, पंढरपुर, सांगली, कुरोली वगैरे गांवीं ह्यांची फार ख्याति आहे. यांचें भजन फारच भक्ति-प्रेमरसानें भरलेलें असतें. गोमेवाडीसहि यांनीं एक **श्रीराममंदिर** बांधलें आहे. **श्रीरामनवमी, हनुमानजयंती** इत्यादि उत्सव मोठ्या थाटाचे व प्रेक्षणीय होत असतात. हे दर्शनीय अधिकारी सत्पुरुष आहेत.

—:0:—



[49]

**SHRI BALA BUVA,** Thal.

*( Living )*

The previous history of this saint was of a different kind. About 30 or 36 years ago he used to come to Bombay city in connection with his work of carpentery. His attitude was then so peculiar that when engaged in his work, he would go on with "Namochar" ( repitition of God's name "Vithal,") which so often deprived him of bodily consciousness and merged him in divine bliss. His Bhajan consisted solely of Shri Tukaram's Abhangas. On ehearing him singing Bhajan cannot avoid the feeling that he is Tukaram himself. He is full of love. For love of his Bhajan people take him to distant places at enormous cost. At Bombay he stays at the house of a well known wealthy man, Son of Gangaram Sayaba Puli, (ka nathi).

---

**( ४९. ) श्री बाळाबुवा,** थळ. ( विद्यमान. )

ह्यांचा पूर्व वृतांत कांहीं निराळाच होता. मुंबई शहरांत ३०-३५ वर्षांपूर्वी हे आपल्या सुतारीच्या वगैरे कामा प्रीत्यर्थ येत असत त्यावेळीं विठ्ठल नामोच्चारानें तद्रूप होऊन ह्यांचे देहभान जागचे जागीं नष्ट होऊन ब्रह्मानंदांत तल्लिन होई. ह्यांचे भजन ह्मणजे श्री तुकारामाचे अभंगावांचून होत नाहीं. भजन करतेवेळीं पाहणारास केवळ प्रति तुकारामच भजन करितात कीं काय असे वाटल्यावांचून रहाणार नाहीं. हे फारच प्रेमळ आहेत. भक्तमंडळी ह्यांस दूर दूर गांवीं भजना प्रीत्यर्थ पुष्कळ पैसे खर्च करून नेत असतात. मुंबईंत आल्यावर ह्यांचा मुक्काम कामाठी गृहस्थ श्रीयुत अंबाजी गंगाराम पुळी ह्या सद्भक्ताच्या घरीं होत असतो व त्यांच्या ठिकाणीं ह्यांची उत्तम निष्ठा आहे. श्रीयुत पुळी हे बुवांची सर्व प्रकारें उत्तम व्यवस्था ठेवितात.



**[40] SHRI KESHAVA BUVA PURKER.** PARNER. *(Living.)*

Born 1851.

This Saint lived on alms till 25 th year of his age. Subsequently for three years he had been a lunatic. Seeing that his lunacy did not leave him, his mother took him to Narsoba vadi, where she had a vision, saying, "Go, I am following you" So, he was brought to Parner, and his lunacy disappeared. Then a love for the study of astrology was born in him. In A. D. 1899 he went to Benares, where, for one year he made "tapascharya" Standing in the water of the Ganges he also made a vow saying, "From this day I will not touch money" and he has not been touching money ever since. He went round to Teertha kshetras and visited four Dhams, twelve Jotirlingas etc. In the mouth of magh in A. D. 1900, he performed "Panchakundi Havan and "Shri Dutta Sthapana in Parner &c.

**( ४०. ) केशव बुवा पुरकर,** पारनेर. ( क्रियमान )

जन्म-शके १७८३.

त्यांनीं आपल्या वयाचे २५ वे वर्षा पर्यंत भिक्षुकी केली, नंतर त्यांस तीन वर्षे वेड लागलें. या करितां त्यांना मातोश्रींनीं नर्सोबाच्या वाडीस नेलें. तेथें तिला दृष्टांत जाहला ' जा, मी तुझ्या पाठीमागून येत आहे'. नंतर शके १८२१ त त्यांनीं काशीस जाऊन एकवर्ष तपश्चर्या केली व गंगेत उभें राहून शपथ वाहून घेतली कीं, मी आजपासून पैशाला शिवणार नाहीं. तोच नियम अद्याप आहे. असें असूनही चार धामें, बारा ज्योतिर्लिंगें वगैरे क्षेत्रें केलीं. शके १८२२ माघांत पारनेरीं पंचकुंडी हवन करून श्रीदत्त स्थापना केली वगैरे.

# या तिसऱ्या भागांतील कांहीं संतांकडून झालेल्या कवितासंग्रहांतील नमुन्यादाखल कविता.

## ( पृष्ठ ३१. ) श्रीमाणिकप्रभुकृत पदें.

**पद**—श्रीगुरू माझा दत्त दयाघनरे ॥ ध्रु० ॥ अंतरचालक त्रिभुवनपालक । सकलांसी जीवनरे ॥ १ ॥ अखंड अगोचर व्याप्त चराचर । शाश्वत चिद्घन रे ॥ २ ॥ माणिक दासासी मिळविलें स्वरूपासी । देऊनि उन्मन रे ॥ ३ ॥

**पद**—गायीं गायीं मना रे हरिचे गुण गायीं ॥ ध्रु० ॥ एक्या भावें तत्पर होउनि । त्यजुनि सकळ कल्पना रे ॥ १ ॥ जातसे दिन दिन व्यर्थचि वाया । नये नरदेह पुन्हा रे ॥ २ ॥ माणिक ह्मणे मना नाम प्रतापें । चुकती यमयातना रे ॥ ३ ॥

**पद**—जेथें तेथें राम भरला रे । त्याविण स्थळ नाहीं उरला रे ॥ ध्रु० ॥ आसनीं शयनीं भोजनीं गमनीं । स्वप्नीं दिवा या रजनीं । निज दृष्टीमाजी ठरला रे ॥ १ ॥ जनीं वनीं गगनीं पवनीं । वन्हीं जीवनीं आणि धरणीं । माणिक हृदयीं संचरला रे ॥ ३ ॥

**पद**—झडकरिं धांव सख्या यदुराया । कोणि नसे मज हृदयिं धराया ॥ ध्रु० ॥ मायामोह पूर नदीमधें वाहलों । स्वाधिन मनाच्या जल बहु प्यालों । कल्पनेच्या लाटा पाहुनि भ्यालों । संसारडोहामधें मी बुडालों ॥ १ ॥ मच्छ काम क्रोध जलचर मगरी । खेकडा मदमत्सर वायु अहारी । वृश्चिक दंभ मंडुक अहंकारी । साही मिळूनी मज जाचिति भारी ॥ २ ॥ चहूंकडे पाहतां कोणिच नाहीं । जीव माझा व्याकुळ झालासे पाहीं । सोडविना कोणी करुं तरि कांहीं । माणिक ह्मणे प्रभु धांवुनि येईं ॥ ३ ॥

**पद**—यादव माधव स्मरण करा रे ॥ ध्रु० ॥ दृश्य पदार्थ अशाश्वत मानुनी । चिद्रूप नेत्रीं भरा रे ॥ १ ॥ सर्वांघटीं हरि व्यापक जाणुनी । निश्चय ठेवीं वरा रे ॥ २ ॥ माणिक ह्मणे हें गुज कळायास्तव । सद्गुरु चरण धरा रे ॥ ३ ॥

## ( पृष्ठ ३२. ) श्रीविठोबा अण्णा दप्तरदारकृत पदें.

**पद**–( उद्धवा शांतवन० या चा० ) राम राम बोला वाणी, मन लावा राघवचरणीं ॥ ध्रु० ॥ कर्मतत्व गहन कळेना, कळलें तरि सांग घडेना । कर्तृताभिमान उडेना, कामाचा दोष झडेना । ब्रह्मार्पण बुद्धि जडेना, पुण्याशीं गांठि पडेना । अंधारि निशा उझडेना, हितकोठुनियां आडरानीं ॥ राम० ॥ १ ॥ साधूचा संग धरावा, नाहीं ज्या आप परावा । स्वकरें तच्चरण चुरावा, हरि महिमा श्रवण करावा । प्रेमभाव हृदयीं धरावा, कीर्तनीं करा सुगरावा । भवसिंधुसुखें उतरावा, जन्माची होय शिराणी ॥ रा० ॥ २ ॥ विषय हे विषापरि विटती, स्वयमेव क्लेशहि सुटती । वासना मूळही आटती, चित्ताच्या वृत्ती तुटती । ज्ञानांकुर हृदयीं फुटती, सहजसर्वसंशय फिटती । कर्मबंध सहसा तुटती, स्वानंद

सुखाची खाणी ॥ रा० ॥ ३ ॥ शास्त्रदीप घेउनि निघतां, निगमागम शोधुनि पहातां। संतांसी हितगुज पुसतां, सुगम हाचि दावी पंथा। आहेत मतांतर कंथा, ज्या रुचल्या नाहिं अनंता। ह्मणुनि हाचि विठ्ठल पंता, पथ गमला निर्मल वाणी ॥ रा० ॥ ४ ॥

**पद**–(राग कल्याण. ताल दिंडीचा.) त्यजुनि कामधाम सदा गाई शामधाम राम ॥ ॥ध्रु०॥ काम येतसे निकाम काम करुनि अष्ट जाम। किति करिसिल दाम दाम दाम दाम ॥ त्य० ॥ १ ॥ आत्मग्रामचा सुकाम काम करुनि हो विराम। भोगि राम नाम हा इनाम नाम नाम नाम ॥ त्य० ॥ २ ॥ संतगीत कथानंत राम श्रीमंत कृपावंत पंत विठ्ठला-भिराम राम राम राम राम ॥ ३ ॥

**पद**–( भजभज जलधिमाजी० या चा० ) परमधाम जलदश्याम रामसखा गाय रे ॥ ध्रु० ॥ ध्यान भजन यजन करुनि, भगवज्जनसंग धरुनि। वरुनि शांति विगलित मनिं, विष्णुपदीं त्वरित जोयरे ॥ पर० ॥ १ ॥ निर्गुणपदि नित्यसक्त, शुक सनक प्रभृतिमुक्त, निरतिशय प्रेमयुक्त, भजति वंद्यपाय रे ॥ प० ॥ २ ॥ अजगजहयमहिषिगाय, तनयस्त्री विविध दाय, केवळ ही जळतखाय पडुनि यांत करिसि हाय रे ॥ पर० ॥ ३ ॥ कवि विठ्ठल राय ह्मणे निर्मद निर्यामपणें सम्मत अनपाय हाचि। भवतरणा शुभ उपाय रे ॥ प० ॥ ४ ॥

## ( पृष्ठ ४८. ) श्रीसच्चिदाश्रमस्वामीकृत अभंग.

**अभंग**–( वेदांतपर )–जो निर्गुण गुणातीत। तोचि जाहला गुणवंत ॥ १ ॥ जग निर्मिलें त्या देवानें। परि गोंविलें मायेनें ॥ २ ॥ देवाहूनि माया थोर। तिसी भजा निरंतर ॥ ३ ॥ भजलिया काय देई। वारंवार जन्म नेई ॥ ४ ॥ माया तरूनियां गेले। एक शुक मुक्त झाले ॥ ५ ॥ सच्चित ह्मणे मुक्तिदेव। एक जाणा दृढ भाव ॥ ६ ॥

**अभंग**–मिथ्या मायेचें हें कोडें। करी जगासी या वेडें ॥ १ ॥ माया आहे दुर-त्यय। इसी नाम तरणोपाय ॥ २ ॥ जरी जन्मासी या आला। घालीं बेडी त्या मायेला ॥ ३ ॥ दूर नाहीं देव संत। नका फिरूं अरण्यांत ॥ ४ ॥ सच्चित ह्मणे आहे नाहीं। पहा विचारूनी देहीं ॥ ५ ॥

**अभंग**–ज्यासी इच्छा मुक्तीची। आशा त्यागा विषयाची ॥ १ ॥ समूळ वासना गेलिया। येउनि मुक्ति पडे पायां ॥ २ ॥ मुक्ति आहे देवापाशीं। हाचि भ्रम अज्ञानासी ॥ ३ ॥ जेथें भक्ति तेथें मुक्ति। दृढ भाव धरा चित्तीं ॥ ४ ॥ ज्ञानाविणें नसे मुक्ति। ऐसें बोलें वेद श्रुति ॥ ५ ॥ सच्चित ह्मणे ज्ञानखूण। जाणे एक नारायण ॥ ६ ॥

**अभंग**–तुह्मी आह्मीं एक संत। आसन देऊं हृदयांत ॥ १ ॥ तुझें नांव शुद्ध सत। मज ह्मणती सच्चित ॥ २ ॥ नामरूप उडालें। चित् सत् एक झालें ॥ ३ ॥ गुप्त करी भजन। तोचि साधु सज्जन ॥ ४ ॥ कोण्या देवाची उपासना। हें न कळे अन्य जना ॥५॥ ऐसा भक्त दुर्लभ। अंतर्ज्ञानाचा कोंभ ॥ ६ ॥ गुप्तभक्त उत्तम। ह्मणतसे सच्चिताश्रम ॥७॥

( पृष्ठ ४९ ) **श्रीविष्णुबोवा ब्रह्मचारीकृत** 'भावार्थ सिंधू' ग्रंथांतील 'भक्तिमार्ग' या प्रकरणांतील ओंव्या.

श्रीराम ॥ भावार्थसिंधूच्या तृतीय प्रकरणीं । आत्मज्ञान झालें तुज लागुनि । आतां ज्ञानोत्तर भक्तीची निशाणी । ती या प्रकरणीं तुज दावूं ॥ १ ॥ तूं तो अद्वैत निराकार । देह चतुष्टयातीत साचार । निश्चल अविनाश निरंतर । आत्मा प्रियकर सकळांचा ॥ २ ॥ गुरुशिष्य देवभक्त । हा भेद नसे किंचित । सेव्य सेवकपण कैचें तेथ । तूं निर्हेत निजात्मा ॥ ३ ॥ परी अंतःकरणपंचक जेथें आहे । तेथें आत्मैक्य भक्ती लागली पाहे । उठतां बैसतां न राहे । अनुसंधान तियेचें ॥ ४ ॥ तीच ज्ञानियांसी तारक होय । अज्ञानियांशी असोन व्यर्थ जाय । ऐशी जी आहे सोय । तीच सांगतों तुजलागीं ॥ ५ ॥ बारे सर्वांसी आपुलेपण प्रिय । कोणासीच न वाटे अप्रिय । परी ज्ञानियासी मी आत्मा ही सोय । ह्मणून तेंच प्रियत्व राहे आत्मत्वीं ॥ ६ ॥ आपुली आपणा असे भक्ति । आपुली आपण सेवा करिती । ज्ञानियासी आपण आत्मा ही प्रतीती । ह्मणून तीच सेवाभक्ति आत्म्याची ॥ ७ ॥ आप आपणा सर्व स्मरती । आप आपणा सर्व ध्याती । ज्ञानी आपणच आत्मा निश्चिती । ह्मणून तेंच स्मरण ध्यान आत्म्याचें ॥ ८ ॥ आपले सुखास्तव व्यवहार । करिताती लहान थोर । ज्ञानियांसी आपण आत्मा हा निर्धार । ह्मणून व्यवहार आत्मार्पण ॥ ९ ॥ आपुले सुखास्तव देशाटण । करिताती सकळ जन । ज्ञानी आपण ब्रह्म निराकार निर्गुण । ह्मणून ब्रह्मार्पण फिरण्याचें ॥ १० ॥ आपुलें कलत्र पुत्र । ऐसें कल्पिती प्राणीमात्र । ज्ञानी आपण आत्मा स्वतंत्र । ह्मणून कलत्र पुत्र आत्माच ॥ ११ ॥ आपुलें गृहक्षेत्र वृत्ति । सकळ जीव भाविती । ज्ञानी आपण आत्मा निश्चिती । ह्मणून गृह क्षेत्रादि आत्मार्पण ॥ १२ ॥ ( वगैरे पुढील विषय मूळ ग्रंथांतुन हवा तर पहावा. )

( पृष्ठ ९३. ) **श्रीकृष्णानंदकृत पदें.**

**पद**–सद्गुरुशी शरण जाय जाय तूं मनारे । तया पदीं अखंड राहे सांडी कल्पनारे ॥ ध्रु० ॥ शरण जाउनि पुसे तया । जन्म मरण तरणोपाया । व्यर्थ भुलूं नको माया । लटके पसारे ॥ स० ॥ अविद्येच्या पूरभयें । वाहताति जग सारें । कल्पनेचा भोंवरा फिरे । असंख्यांत सारे ॥ स० ॥ २ ॥ अद्वैत ध्यान करी । निरंतर भक्ति करी । गुरुवाक्य अंगिकारी । अव्हेरू नको रे ॥ स० ॥ ३ ॥ अद्वैत ध्यान सर्व । आटुनिया सांडी गर्व । कृष्णानंद ह्मणे पर्व । ऐसें पुन्हा नयेरे ॥ स० ॥ ४ ॥

**पद**–मज हें गुरु कृपेचें देणें ॥ मज० ॥ ध्रु० ॥ चव शुन्यावरी अलक्ष मुद्रा । षड्चक्रावरी पेणें ॥ म० ॥ १ ॥ ब्रह्मानंदें सखये नाथा । जीवन्मुक्तचि लेणें ॥ म० ॥ २ ॥ कृष्णानंद ह्मणे आशाच नाहीं । गुरु नामामृत घेणें ॥ म० ॥ ३ ॥

**पद**–करीं दत्त सखा पूर्ण सखा पाव मना रे ॥ ध्रु० ॥ निशिदिनीं जरी करिशि भजन । चुकेल तरी जन्म मरण । मनन करुनि धरुनि चरण । शरण जाईं संत जना रे ॥ क० ॥ १ ॥ विषय करुनि वमन समचि । न घडेल तरी फजित जितचि । मग धरी

हरीगूण सतत रुचि । हेंच हित होय जना रे ॥ क० ॥ २ ॥ भावें गुण वर्णन करीं । छळितिल तुज कधिं नारे । भव जलधिमाजि होय परी । कांहिं सुचेना रे ॥ ३ ॥ ह्मणे कृष्णानंद । गुरूपदीं वंद्य । तुटेल भववंध । जन्ममरणाचे रे ॥ क० ॥ ४ ॥

## ( पृष्ठ ९४. ) श्रीसीताराम महाराजकृत अभंग.

**अभंग**—वियोग न घडे कदापि हो माझा । सांगतों सहजा तुह्मां लागीं ॥ १ ॥
कार्यासाठीं येणें घडलें असे तें । बहुत जना तें उद्धरावें ॥ २ ॥
मूढ झाले जन संसारीं गुंतती । कोणी न ऐकती माझें आतां ॥ ३ ॥
भाग्याविण नोहे संतांची ती खूण । भाव धरा जाण दृढ मनीं ॥ ४ ॥
राम ह्मणे ऐका संत तोचि देखा । जडला जो निका विठ्ठल पायीं ॥ ५ ॥

**अभंग**—संतीं सांगीतलें मजसीं । करावें तूं कवित्वासी ॥ १ ॥ इंद्रादिक देव आले । त्यांनीं मज प्रार्थियेलें ॥ २ ॥ त्यांचे गाईन चुटके । धन्य तुकारामादिकें ॥ ३ ॥ भूमी भार वाढला हो । जावें तुह्मीं त्वरीत हो ॥ ४ ॥ येऊं आह्मी मग ते संत । निरोपिलें मज यथार्थ ॥ ५ ॥ ह्मणुनी वेंचे रचवितों । मूढां बोध पढवितों ॥ ६ ॥ हा असे तिजा प्रहर । अनीति मांडिली साचार ॥ ७ ॥ नाहीं कोठें जागा मज । जाऊं कोठें मी तो आज ॥ ८ ॥ येती आतां संत देखा । सत्य सत्य वाचा ही का ॥ ९ ॥ सख्या विठ्ठलाची आण । जरिं कां खोटें मी बोलेन ॥ १० ॥ तरि का आतां जिव्हा झडो । देह काष्ठ भूमी पडो ॥ ११ ॥ येती आतां एकनाथ । आले असती क्वचित् भक्त ॥ १२ ॥ पूर्वी होता त्यांचा ठावो । आतां पडला असे भावो ॥ १३ ॥ त्यांची नाहीं तुह्मां खूण । भावी सायासें पुसून ॥ १४ ॥ राम दीन सांगतसे । आतां होती झाले नसे ॥ १५ ॥

## ( पृष्ठ ६६. ) श्रीमाधवेंद्रस्वामीकृत पदें.

**पद**—स्वहित करीं झडकरीं । प्राण्या निर्मळ हो अंतरीं ॥ ध्रु० ॥ क्षणिक आयुष्य शाश्वत नोहे । समज मनीं निर्धारीं ॥ प्रा० ॥ १ ॥ आशा तृष्णा मानस त्यागीं । दृढशांति आदरीं ॥ प्रा० ॥ २ ॥ काम क्रोध लोभ मोहादि । विवेकें दूर करीं ॥ प्रा० ॥ ३ ॥ माधवेंद्र ह्मणे हरिहरस्वामीच्या । समपदीं वास करीं ॥ प्रा० ॥ ४ ॥

**पद**—सद्गुरूसी लीन होई । प्राण्या खरी प्रचीति घेईं ॥ ध्रु० ॥ सद्गुरुपद हें मानव नोहे । अंतरदृष्टी पाहीं ॥ प्रा० ॥ १ ॥ तयावरी तूं द्वेषबुद्धिनें । बोलणें योग्य नाहीं ॥ प्राण्या० ॥ आपुले हितास्तव कठिण शब्दही । आनंदें झेलित जाई ॥ प्रा० ॥ ३ ॥ उलट उत्तर बरोबरीनें । भाषण करूं नको कांहीं ॥ प्रा० ॥ ४ ॥ माधवेंद्र ह्मणे जरी हें न रुचे । तरी खुशाल वेगळें राहीं ॥ प्रा० ॥ ५ ॥

**पद**—सोहं समाधी साधी । मनुजा सहजीं कार्यसिद्धी ॥ ध्रु० ॥ तत्त्वमसीचा बोध सांगुनि । कर्णी प्रेष करिती ॥ म० ॥ १ ॥ पूरक कुंभक रेचक सम्यक् । एकांतीं धरविती ॥ मनु० ॥ २ ॥ अभ्यासानें परी पक्कता । माधवेंद्रासी करविती ॥ मनु० ॥ ३ ॥

## ( पृष्ठ ७६. ) श्रीसीताराम महाराज ट्येंग्येकृत पदें.

**पद**–अमोल काया जाइल वाया प्राण्या विचार करि चित्तीं ॥ ध्रु० ॥ लख चौऱ्यांशीं फेरे फिरतां मानव देहा आलासी । विषय सुखाला पशुवत भुलुनी स्वस्वरूपाला मुकलासी ॥ अ० ॥ १ ॥ गृह धनदारा आप्त सुतादिक देहाचे हे साथी रे । यमरायाची वर्दी येतां कोणि नये तुज संगें ॥ अ० ॥ २ ॥ भौतिक देह हा टांकुनि भूवरि संगें येइल पुण्यपाप । लिंगदेह तो काढुन नेती अपार दुःखें भोगिसि रे ॥ अ० ॥ ३ ॥ नरदेह हा पुन्हां नये तुज ऐसें जाणुनि तूं चित्तीं । नित्या नित्य हा विवेक करुनी सद्गुरुचरणीं शरण रिघें ॥ अ० ॥ ४ ॥ सज्जन संगति नित्य धरोनि ईश्वर भजनीं रंगुनि जा । सीताराम हा प्रार्थितसे तुज चित्तीं विचार करुनि पहा ॥ अ० ॥ ५ ॥

**पद**–प्रभो जानकीवल्लभा येइं रामा । पोळलों भवदवें तारि आह्मां ॥ ध्रु० ॥ दुष्ट राक्षस बहू मातले भूवरी । दुःख देती सदां गोद्विजांतें । धर्म रक्षावया प्रगट झालासि तूं, मारुतीसहित ती कीश सेना ॥ प्र० ॥ १ ॥ सिंधु उतरावया सेतु हा बनवुनी, जाळिली राक्षसांसहित लंका । कीर्ति ध्वज स्थापुनी जनकजा घेउनी पातले स्वाश्रमा मूळ धामा ॥ प्र० ॥ २ ॥ स्थान रेवातटीं घाट ब्रह्माणिचा, विप्र तैलंग हें राहति जेथें । चैत्रमासीं पहा करिति उत्साव हा, ब्राह्मणा भोजनें देति नाना ॥ प्र० ॥ ३ ॥ दक्षिणे लक्ष्मण वामिं जनकात्मजा, वायु सूनू उभा अग्र भागीं । भक्तसंरक्षणा निष्ठती भूवरी, हर्ष वाटे मनीं सीतारामा ॥ प्र० ॥ ४ ॥

## ( पृष्ठ ७७ ) श्रीकृष्ण कदमकृत पदें.

**पद**–कसा तुज भेटेल माधवरे ॥ ध्रु० ॥ मोहममता भ्रम अविद्येचा । फिटला नसे जंवरे ॥ क० ॥ १ ॥ साधुजनासी कृत्रिम करिसी । दाविसी लाघवरे ॥ क० ॥ २ ॥ ज्ञान विरक्ति नवविध भक्ती । याची नसे चवरे ॥ क० ॥२॥ कृष्णप्रभूविणें दुर्गम गमतो । सुगम हा भवरे ॥ क० ॥ ४ ॥

**पद**–घेईं रे नाम हरीचें गोड ॥ ध्रु० ॥ स्त्री-पुत्रादी व्यर्थची सर्वी । ममता यांची तोड ॥ घे० ॥ १ ॥ विषयसुख तें दुःखचि मानुनी । मोडीत सोडीत सोड ॥ घे० ॥ २ ॥ स्वर्ग ठेंगणें होईल तुजला । करशिल जरीं हो जोड ॥ घे० ॥ ३ ॥ कृष्णराय मन पायिं समर्पित । सांगतो दुर्बळ रोड ॥ घे० ॥ ४ ॥

**पद**–राम बिन कोण करे भव पार ॥ ध्रु० ॥ धन कारण सब अपने कहत है । भाई लडके नार ॥ रा० ॥ १ ॥ जबलग घटमें प्राण बसत है । तबलग इसका बिचार ॥ रा० ॥ २ ॥ किसनदास कहे नाम जपत रहो । निगमागमके सार ॥ रा० ॥ ३ ॥

**पद**–दिवाने दूर करो संसार ॥ ध्रु० ॥ लेने देने मो दीन बुडाया । रात डुबावे नार ॥ दि० ॥ १ ॥ शाम सुंदरकी सेवा चूकी । कोण करे भवपार ॥ दि० ॥ २ ॥ किसनराय प्रभु पायबी न्याहारे । नाम धरे आधार ॥ दि० ॥ ३ ॥

---

# अथ षोडशोपचार देवपूजा.

( स्नानादिक आटपल्यानंतर शुचिर्भूतपणें आसनावर बसून द्विराचमन प्राणायामादिक करून देवपूजेचा भक्तिपूर्वक संकल्प करावा. )

"श्रीगजानन, श्रीलक्ष्मीनारायण ( अथवा अमुक इष्ट ) देवता प्रीत्यर्थं यथा ज्ञानेन यथामिलितोपचारद्रव्यैः षोडशोपचार पूजनमहं करिष्ये" असें ह्मणून उदक सोडावें. व देवपूजेस आरंभ करण्यापूर्वी कलशपूजा, शंखपूजा, घंटापूजा व दीपपूजा करावी, ती– "कलशदेवताभ्यो नमः सकल पूजार्थे गंधाक्षत पत्र पुष्पं समर्पयामि, शंख देवताभ्यो नमः सकल पूजार्थे गंधाक्षत पत्र पुष्पं समर्पयामि, घंटा देवताभ्यो नमः सकल पूजार्थे गंधाक्षत पत्र पुष्पं समर्पयामि, दीपदेवताभ्यो नमः सकलपूजार्थे गंधाक्षत पत्र पुष्पं समर्पयामि." असें ह्मणून त्या त्या देवतेवर गंधादि वाहणें. ही पूजा झाल्यावर नंतर शंखांतील पाण्यानें सर्वपूजाद्रव्यें व आपलें अंग प्रोक्षावें. त्यावेळीं—"**अपवित्र पवित्रो वा सर्वावस्थां-गतोऽपि वा । यः स्मरेत्पुण्डरीकाक्षं सबाह्यान्तरं शुचिः**" ॥ हा मंत्र ह्मणावा. नंतर त्या त्या देवतेचें ध्यान श्लोक ह्मणून 'ध्यानं' समर्पयामि ( ह्मणावें, नंतर हृदयांतील भावनामय दिव्य मूर्तीस पूजेच्या प्रतिमेंत आणून स्थापावें व ) 'आवाहनं' समर्पयामि—"शांतोभव, सुप्रसन्नोभव, वरदोभव, अभिमुखोभव," असें ह्मणून मूर्तीवर अक्षता घालाव्या. मग ती प्रतिमा–शिला, काष्ठ, मृत्तिका अथवा चित्रमय कसलीही असो–अगदीं जिवंत आहे, प्रत्यक्ष आहे, अशी भावना करून पुढील उपचार मानस व स्थूल समर्पण करावे. प्रत्येक उपचारापुढें 'समर्पयामि' असें ह्मणावें.) 'आसनं' स० ( अक्षता वहाव्या.) 'पाद्यं' स० ( पाणी सोडावें ) 'अर्घ्यं' स० ( पाणी सोडावें ) 'आचमनीयं' स० ( पाणी सोडावें ) 'स्नानं' स० ( पंचामृतस्नानं—पय–दधि–घृत–मधु–शर्करास्नानं सम०, मंदोदकस्नानं, शुद्धोदकस्नानं स०; येथें पुरुषसूक्तादिकाचा हवा तर अभिषेक करावा. मूर्ति कागदावरील अथवा मातीची असेल तर फक्त पाण्यानें प्रोक्षण करावें ) वस्त्रोपवस्त्रं स०, ( सुवर्णमौक्तिकरत्नालंकारान् स० ) 'यज्ञोपवीत' स०, 'गंधं' स०, ( देव्यै हरिद्रा कुंकुमं सौभाग्यद्रव्यं स० ) 'पुष्पं' स०, ( तुलसीपत्रं, बिल्व, दूर्वा इ० त्या त्या देवतेचे प्रिय पदार्थ अर्पावे. ) 'धूपं' स०, 'दीपं' स०, 'नैवेद्यं' स०, (मध्योपानीयं, उत्तरापोषनं, हस्तप्रक्षालनं, मुखप्रक्षालनं, करोद्वर्तनार्थे चंदनं ) 'तांबूलं' स०, ( सुवर्ण पुष्प दक्षिणां, महाफळं स० ) 'महानिरांजनदीपं स०, ( आरत्या ह्मणाव्या ) 'मंत्र पुष्पांजलिं' स०, ( प्रदक्षिणां, नमस्कारान्, छत्रं, चामरं, व्यजनं, दर्पणं, गीतं, नृत्यं, वाद्यं, आंदोलनं, वेदपारायणं, नटनाट्यं, रथगजाश्वपदातीन् स०; सर्व राजोपचारार्थे अक्षतान् समर्प०)

१ मुख्यप्राण–सनकादि देवताभ्यो नमः पाद्यार्घ्य–आचमन–स्नान–वस्त्रोपवस्त्र–यज्ञोपवीत–गंध–पुष्प–तुलसीदळ ( निर्माल्य ) धूप–दीप–नैवेद्यं–( शेष नैवेद्यं ) स० मध्येपानीयं–उत्तरापोषनं–हस्तप्रक्षालनं–मुखप्रक्षालनं–करोद्वर्तनार्थे चंदनं तांबूलं–सुवर्णपुष्पदक्षिणां–आर्तिक्यं स० सर्व राजोपचारार्थे अक्षतान् समर्पयामि.

( पूजेंतील उपचारांचा व मंत्राचा अर्थ न कळल्यामुळें जड भावनेनें पूजा होते. अर्थ समजून पूजा केल्यानें योग्य फल प्राप्त होतें. याकरितां देवपूजेंतील उपचारांचे अर्थ खालीं दिले आहेत. )

१ **आवाहन** म्हणजे बोलावणें:—पूजेच्या प्रतिमेंत पूजा ग्रहण करणेकरितां ये ये अशी नम्रपणें देवाची प्रार्थना करणें, ( व तो प्रतिमेंत येऊन बसला अशी भावना करणें. )

२ **आसन**—म्हणजे बसण्याची बैठक:—( रत्नखचित सिंहासन कल्पिणें. )

३ **पाद्य**—पाय धुण्यास पाणी देणें.

४ **अर्घ्य**—हातावर पाणी घालून देवाचे हात धुणें.

५ **आचमन**—चूळ भरणेस पाणी देणें.

६ **स्नान**—आंग धुणें, आंघोळ.

७ **वस्त्रोपवस्त्र**—नेसण्याचें व पांघरण्याचें वस्त्र. ( पीतांबर इ० )

८ **यज्ञोपवीत**—जानवें.

९ **गंध**—चंदन ( तिलक व उटी. )

१० **पुष्प**—नाना प्रकारचीं सुवासिक फुलें.

११ **धूप**—सुवासिक उदबत्त्या, अगरबत्त्या वगैरे जाळणें.

१२ **दीप**—तुपाच्या तीन वाती पेटवून ओंवाळणें.

१३ **नैवेद्य**—षड्रसान्नाचें-पंचपक्वान्नाचें जेवण देणें.

१४ **तांबूल**—भोजनोत्तर खाण्याचा त्रयोदशगुणी विडा देणें.

१५ **महानीरांजन दीप**—फुलवाती, कापुर वगैरे ओंवाळणें.

१६ **मंत्रपुष्पांजलि**—ओंजळींत फुलें घेऊन अभिमंत्रित करून वाहणें.

हे षोडश ( सोळा ) उपचार 'मुख्य' उपचार होत. ( कंसांतील उपचार हे 'गौण' उपचार समजावे. त्यांचा अर्थ साधारणतः समजण्यासारखा असल्यामुळें दिला नाहीं. ) याप्रमाणें देवाधिदेवाची-इष्टउपास्याची कल्याणेच्छु पुरुषानें नित्य पूजा करावी. स्थूल प्रतिमेची करणेस सवड नसली तर मानसपूजा तरी करावी. स्थूल प्रतिमेची पूजा अथवा हृदयस्थ प्रतिमेची मानसपूजा करतांना राजाधिराजालाही दुर्मिळ असे दिव्य श्रीमंती उपचार मनानें कल्पून मोठ्या प्रेमादरानें व भक्तिभावानें देवास अर्पण करावे. यायोगें आपलें उपास्य दैवत सुप्रसन्न होऊन सर्वार्थी कृपा करील.

अथ भगवत्प्रार्थना.—( फार सावकाश व मनोभावानें करावी. )

**" काले वर्षतु पर्जन्यः पृथिवी सस्यशालिनी । देशोऽयं क्षोभरहितो ब्राह्मणाः सन्तु निर्भयाः ॥ १ ॥ अपुत्राः पुत्रिणः सन्तु पुत्रिणः सन्तु पौत्रिणः । अधनाः सधनाः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः सर्वे सन्तु निरामयाः ॥ २ ॥**

"आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा०" इ० प्राकृत अभंग वाणीनें व गद्य वाणीनेंही प्रार्थना करावी. आणखी आपल्या मनांत जी इच्छा असेल ती मागून घ्यावी, मुख्यतः भक्तिप्रेमसुख मागावें. **"यस्यस्मृत्याच नामोक्त्या तपःपूजाक्रियादिषु । न्यूनं संपूर्णतां यातु सद्यो वंदे तमच्युतं ॥ मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं जनार्दन ॥ यत्कृतंतु मयादेव परिपूर्णं तदस्तुमे ॥" अनेन यथा ज्ञानेन यथामिलितोपचारद्रव्यैः पूजनेन भगवान् तेन श्रीमहाविष्णुः** ( इष्टदेवता ) **प्रीयताम्, प्रीतोभवतु तत्सत् श्रीकृष्णार्पणमस्तु ॥** असें म्हणून पाणी सोडून नम्रतापूर्वक भक्तिप्रेमानें नमस्कार करावा व प्रतिमेंतील चैतन्यमूर्ति पुनः आपल्या हृदय-मंदिरांत आणून स्थापावी व तिचें शक्य तितका वेळ ध्यान करावें. याप्रमाणें भक्तिभावानें पूजा करणारावर भगवंत प्रसन्न होऊन त्याचे सर्व मनोरथ पूर्ण करितो. हा दृढ विश्वास अंतःकरणांत सदैव बाळगावा. नंतर आपल्या इष्ट देवतेच्या आरती म्हणाव्या.

( आरत्या करून संपल्यानंतर )

घालीन लोटांगण, वंदीन चरण । डोळ्यांनीं पाहीन रूप तुझें ॥ १ ॥ प्रेमें आलिंगिन, आनंदें पूजिन, भावें ओंवाळिन म्हणे नामा ॥२॥ त्वमेव माता च पिता त्वमेव। त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ॥ त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव । त्वमेव सर्वं मम देवदेव ॥ २॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्यात्मना वा प्रकृतिस्वभावात् ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पये तत् ॥ ३ ॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरिं । श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्र भजे ॥ ४ ॥ हरे राम हरे राम राम राम हरे हरे । हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥

## अथ मंत्रपुष्पं.

ॐ राजाधिराजाय प्रसह्यसाहिने । नमो वयं वैश्रवणाय कुर्महे । स मे कामान्कामकामाय मह्यं । कामेश्वरो वैश्रवणो ददातु । कुबेराज वैश्रवणाय महाराजाय नमः । ॐ स्वस्ति । साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं महाराज्यमाधिपत्यमयं समंतपर्या ईस्यात् सार्वभौमः सार्वायुषांतादापरार्धात् । पृथिव्यै समुद्रपर्यंताया एकराळिति । तदप्येषश्लोको भिगीतो "मरुतः परिवेष्टारो मरुत्तस्यावसन्गृहे ॥ आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासद" ॥ इति ॥ महामंत्रपुष्पांजलिं समर्पयामि ॥ ॥ ॥ ॥



**जय जय रघुवीर समर्थ.**

# दाभोळकरकृत पदें.

१ पद ( व्यर्थ मी जन्मलें थोर कुळीं, या चा० )

माया न सोडी मी काय करूं ॥ या उपरी किती धीर धरूं ॥ध्रु०॥ तुज सम तारक सोडुनि दत्ता ॥ भवनिधि कैसा तरूं ॥१॥ विश्व नसुनि विश्वंभर तूं हा ॥ बोध कसा विसरूं ॥२॥ तव पद ठाव मिळुनी आतां ॥ तेथुनि कां विसरूं ॥३॥ सच्चिसुखनिधि माजि लवण मी ॥ समरस कां न विरूं ॥४॥ त्रिपुटी न उरे तेथें शांत आराम न शके वरूं ॥ ५ ॥

# पालखीचीं पदें.

( खालिल नउविध भक्तीपर नऊ पदें गोमंतक सांखळी येथें श्री दत्तात्रेयाची पालखी १५ दिवसांत निघते तेव्हां नऊ ठिकाणीं पेणी करिते त्यावेळीं ह्मणण्याकरितां केलीं आहेत.)

२ पद ( पंचतुंडनररुंडमालधर, या चालीवर. )

त्रैलोक्याचा नाथ दत्तगुरु साखळींत प्रत्यक्ष वसे ॥ निजभक्तांची कळकळ धरण्यास्तव तो प्रभु जागृत विलसे ॥ ध्रु० ॥ प्रतिमासीं पौर्णिमेस रात्रौ शिबिकोत्साह होत असे ॥ दर्शन घेतां संगें जातां यम मनिं मत्सर उपजतसे ॥ सव्य प्रदक्षिणा शिबिका नेती सज्जन गाती भक्तिरसें ॥ सगुणीं निर्गुण पहातां शांत आरामासी पार नसे ॥ १ ॥

३ पद ( दत्त दत्त दत्त हाचि जपकरी मना, या चा० )

श्रीगुरु नव भक्ति रसें मार्ग दाविती ॥ नउ पेणीं करुनि मूळ स्थानि परतती ॥ध्रु०॥ तुलसि भक्ति स्मरुनि प्रथम जेथ थांबती ॥ श्रवण करा तेथ दत्त नाम गर्जती ॥ स्तुति पाठारंभ करा त्यजुनि लाजती ॥ शांतारामा पेणें सुखद वदुं किती ॥ १ ॥

४ पद ( अशिही भक्ती, या चा० )

दुसरें पेणें ॥ अश्वत्थासंन्निधजाणें ॥ ध्रु० ॥ अश्वत्थाचें रूप दाविणें, ठाणें धरुनी त्या चेतविणें ॥ ज्ञान देउनी त्या सोडविणें ॥ प्रभुचें देणें ॥ १ ॥ द्वितिया भक्ती कीर्तन करणें ॥ स्वयें तरूनी इतर तारणें ॥ शांतारामा हेंचि मागणें ॥ स्वरुपीं नेणें ॥ २ ॥

५ पद ( नित्य निरंजन निराकार जो, या चा० )

श्रीदत्त पदीं सतत स्मरण पेणें हें तिसरें ॥ एकवार भिळतां मनुजा अखिल जन्ममरण सरे ॥ ध्रु० ॥ देवालय नरदेह तयांतचि आत्मा देव ठरे ॥ जीवन्मुक्ता शक्यचि फिरणें प्रदक्षिणा कारे ॥ १ ॥ ब्रह्मदृष्टिनें नाम रुपात्मक विश्वहि ब्रह्मिमुरे ॥ शांतारामा श्रीगुरु चरणीं नित्यानित्यनुरे ॥ २ ॥

६ पद ( उबगलें सासऱ्या, या चा०. )

अंतःकरणीं ठसा उमटला श्रीदत्ताच्या चरणांचा ॥ तें समजावा योग साधला पादसेवन भक्तीचा ॥ ध्रु० ॥ चित्प्रकाश जो योग्यां दुर्लभ सुलभ तधीं झाला साचा ॥ सूक्ष्म रुपानें मार्ग दिसे तो हद्दा भार द्वाराचा ॥ १ ॥ अनुभव घेतां स्वरुपामागें लीन व्हावया वृत्तीचा ॥ झोंक जातसे निवृत्तीपर अखंड शांतारामाचा ॥ २ ॥

**७ पद** ( सर्व कर्म मम दत्ता तुजला, या चा० )

भक्ति पांचवी पाहीं अर्चन दत्त स्वरूपाचें ॥ निर्गुण सगुण ऐक्य जाहलें प्रकाश मूर्तिचें ॥ ध्रु० ॥ विषय ताप संतप्त नराला सुकल्प वृक्षाचें ॥ उंच स्थळ जें सहज सांपडे तें उपासनेचें ॥ स्वरुपामागें मुलीन होउनि परतुनि विश्वाचें ॥ सार्थक करण्या घडे आगमन शांतारामाचें ॥ १ ॥

**८ पद** ( श्रीविधिहरिहर, या चालीवर )

स्वरूप दर्शन सार्वभौम पद भोगुनि जें फिरसी ॥ पांचहि विषय द्वारांतुनि तूं ब्रह्म अनुभविसी ॥ ध्रु० ॥ संकल्प विकल्पाचें ऋण तें आपोआप फिटे ॥ ब्रह्म भुवन भोगाची इच्छा तत्काळीं निसटे ॥ स्थिर चरात्मक विश्वचि अवघें प्रेमास्पद वाटे ॥ पळ पळ मात्रें ठायीं ठायीं उपासना भेटे ॥ वंदन करितां पादसेवनीं दृष्टि जाइ नेटें ॥ अंतःकरणीं अखिल जगाचें गुरुत्व घनदाटे ॥ श्री दत्तपदीं शांतारामा बळेंचि बोलविसी ॥ १ ॥

**९ पद** ( सद्गुरुविना पथ दिसेना, या चा० )

श्रीदत्तगुरू दास्य करूं पाय धरूं या ॥ कवण रूप घेउनि आह्मी विनवुंया तया ॥ कवण ठाव कवण भाव धरुनि राहुं या ॥ काळ कवण किं प्रमाण निरभिमान सुमन वाहुंया ॥ १ ॥ असो नसो रूप ठाव भाव मान ही ॥ दास्य हेचि सख्य करिल नामुनी दुही ॥ सत्वर तरूं भव निधि गुरु पदिं शांताराम पाहुंया ॥ २ ॥

**१० पद** ( श्रीरंग गोपिकोत्संग, या चा० )

गुरुराज दत्त महाराज प्रगटला काज धरुनि भक्तांचें ॥ हें निकट पहावा ठिकाण सख्यत्वाचें ॥ ध्रु० ॥ भगवन्त घेउनीभक्त साधि एकांत अचल प्रीतीचा । तें अंत होतसे सुखें शुद्ध पक्षाचा ॥ तो देव धरुनियां कींव । करी सख्यत्व मूढ ताराया । हा ठाव आठवा नुरवि चतुर्विध काया ॥ चाल ॥ मी कसा हुंगुनी धरूं । कीं चुंबुकर्णि त्या भरूं । कीं स्थीर दृष्टिनें वरूं ॥ पूर्वचाल ॥ वाटुनी कंठदाटुनी मिठी मारुनी आंत रिघण्याचें ॥ हें धाडस बघ शांतारामाचें ॥ १ ॥

**११ पद**–( जमका अजब तडाका बे, या चा० )

ही श्रेष्ठ नवम भक्ती ॥ ज्याची त्या आत्मप्रचिति ॥ ध्रु० ॥ चारी वाचा लाजुनि जेथें तटस्थ दुरुनी पहाती ॥ नवीन वधु जशी भर्त्यालागी खुणेनेंचि दाखविती ॥ १ ॥ देहचतुष्टय सर्व अवस्था एकवटल्या एकांतीं ॥ अंत ह्मणाया घेणें भागची त्रिपुटी पर प्रवृत्ती ॥ २ ॥ देवालय नरदेह वाटला पूर्वी जडांश ह्मणुनी ॥ तोही संशय गेला आतां एकत्वें उमजूनी ॥ ३ ॥ चिज्जड ग्रंथी हीच सूटली जड तें चिद्रूप ठेलें ॥ अहंकार कर्पूर जळाला शेजे ब्रह्म पहुडलें ॥ ४ ॥ अनिक्रोनें निजभक्तांसी स्वयेंचि आपणा दिधला ॥ श्रीदत्ताविण ब्रह्म नसे या शांनारामाला ॥ ५ ॥

**१२ पद** ( पहा कोण कामि पडे, या० चालीवर )

पंच प्राण निंबलोण दत्तसख्या वरुनि आजिवोंवाळूंया ॥ ध्रु० ॥ चर्म दृष्टि मूढांची ज्ञानदृष्टि संतांची ॥ लागलीसे अनादिची दत्तरुपीं केंवि काढुंया ॥ १ ॥ औठ हात देहाचा नारळ अमुचा साचा ॥ प्रिय शांतारामाचा सुमनांसह खास उतरुंया ॥ २ ॥

**१३ पद** ( दाखविली कांती सुवर्ण केतकी, या चा० )

आजि पाहिलें रूप दिगंबर श्रीदत्तात्रय स्वामीचें ॥ ध्रुवाख्यान श्रवणीं जैं बसलों ॥ दर्शन ध्रुव घडलें साचें ॥ ध्रु० ॥ तेजोमय सर्वांग पहातां चंचलत्व माझ्या मनिचें ॥ अचल जहालें या रूपीं सुख वर्णू न शके मी वाचे ॥ जहजानंदें डुलतां वृत्ती अष्टहि सात्विक भावाचे ॥ स्फुरण होउनी तेंहि निमालें चित्सुखिं शांतारामाचें ॥ १ ॥

**१४ पद** ( जमका अजब तडाका बे, या चा० )

तमाशा अजब गारुडीका ॥ दिखाऊ सबकूं बिन धोका ॥ ध्रु० ॥ माया गौ रुप चार बेदनो कुत्ते कर कर लाया ॥ स्वरूप अपना एक न राहवे अवधूत नाम पाया ॥ १ ॥ कहां एक मुख कहां तीन मुख जती कहां सन्यासी ॥ कहां जटाधर बम्मनहुवे कहां तपी ऊदासी ॥ २ ॥ सच्चा तो सब झूट दिखावे झूट कर सके सच्चा ॥ मिलाफ करके आपहि बोले क्या झूटा क्या सच्चा ॥ ३ ॥ मट्टीका तो करे रुपय्या लोभी जनकुं भुलावे ॥ हातमेंदेकर मट्टीफिर करे, लेवेसो पस्तावे ॥ ४ ॥ सब दुर्गंधी एक मिलाकर देह बनावे खासा ॥ एक करे नर दुसरी नारी अंदर आपही घूसा ॥ ५ ॥ कर्म धर्म सब आपहि होकर आपन आपकुं माने ॥ शांतारामकुं मर्म दिखावे साथले चला आपने ॥ ६ ॥

**१५ पद** ( मी मरतों श्रीगुरु दत्ता, या चा० )

श्रीदत्ता तव नामी मज लागो निशिदिनिं छंद भला ॥ ध्रु० ॥ तवचरणाविण अन्य आसरा कधिं न दिसो मजला ॥ १ ॥ इहपर भोगीं विटुनि मन हें एक धरो तुजला ॥ ॥ २ ॥ नामरुपात्मक जडतें प्रगटो सच्चित् स्वरुपाला ॥ ३ ॥ देह चतुष्टय मीपण न उरो शांतारामाला ॥ ४ ॥

**१६ पद** ( दत्त दत्त दत्त हाचि, या चा० )

विषय नाशिवंत असा समज जरि पडे ॥ उमज कधिं न होई कीं दैव वांकडें ॥ध्रु०॥ भवदुःखी आत्मसूख कल्पना जडे ॥ परिहारास्तव करणें कष्ट मग घडे ॥ १ ॥ निजानंद जाउनियां दैन्य रोकडें ॥ बहुरूपें जेथ तेथ सतत सांपडे ॥ २ ॥ दैव एक फिरल्या श्री दत्त ही दडे ॥ शांतारामामुकर्म उलट तें नडे ॥ ३ ॥

**१७ पद** ( तमाशा अजब गारुडीका, या चा० )

त्यानिर्गुणिं ध्यावे काय ॥ सगुणीं मिळती श्री गुरुपाय ॥ ध्रु० ॥ निराकारि कवणासी ध्यावें जोध्याता तो ध्येय ॥ प्रेम भक्तिचें नसे प्रयोजन देह हि व्यर्थचि जाय ॥ १ ॥ पापपुण्य जरि नसंभवे मग किमर्थ सर्वहि उपाय ॥ निर्गुणरूपा पहावें कैसें त्रिपुटी जेथ अपाय ॥ २ ॥ कर्मापासुन ज्ञान दाविण्या सगुणि धरीं दृढ ठाय ॥ शांतारामा जन्मा आणी दत्तसद्गुरू माय ॥ ३ ॥

**१८ पद** ( राम स्मरावा राम, या चा० )

तारक श्रीगुरुराज दत्तहा ॥ तारक श्री० ॥ ध्रु० ॥ या संसारीं बुडतां प्राण्या ॥ काढुनि पुरवी काज ॥ दत्तहा ॥ १ ॥ अतुल प्रेम भक्तांवरि ठेवी ॥ मोडी दुर्जन माज

दत्तहा० ॥ २ ॥ निंद्यहि सेवा स्वांगें अचरी कार्धि मानीना वाज ॥ दत्तहा ॥ ३ ॥ शांतारामा घरिं तिष्ठतसे प्रत्यक्ष पहा आज ॥ दत्तहा ॥ ४ ॥

**१९ पद** ( सर्व कर्म मम० या चा० )

काय भाग्य हें सद्भक्तांचें प्रभु आला या अवतारा ॥ अनसूये कुशी जन्म घेउनीं धरि दासांच्या कैवारा ॥ ध्रु० ॥ उत्पत्ति स्थिति प्रळय कारणीं नेमियलें विधि विष्णु हरा ॥ शुद्ध रूप निज गुरुत्व ठेवी त्रिविधताप मुळ संहारा ॥ ब्रह्मसनातन वैराग्यातें पाळुनि दावी मार्ग खरा ॥ त्रैमूर्तीच्या सत्वांशाचा केवळ बनला हा मोहरा ॥ विषय वायुचा स्पर्श न ठेवी सुजना दे निज पदिं थारा ॥ जनांत कानन आनंदाचें करुनि वसे भक्तोद्धारा ॥ सुवर्ण केतकी कांति विराजे भस्मोद्धूलित मनोहरा ॥ प्राणाचें निंबलोण उतरी शांतारामचि एकसरा ॥ १ ॥

**२० पद** ( श्रीविधिहरिहर, या चा० )

श्रीदत्ता विण माझा जिवलग ब्रह्मांडीं न दिसे ॥ जीवातित तो गर्भ सुखाचा तारक सत्य असे ॥ ध्रु० ॥ पतित दुष्ट मी आहे तरिही त्या सुष्टचि भासे ॥ मातेहुनि कळकळ बाळगितो प्रेम अपूर्व असे ॥ मंत्र तंत्र सुज्ञान नसुनिमज कैसा भुललासे ॥ मूढ मतीनें सेवा करितां आनंदीं विलसे ॥ संसारीं मी लुब्धचि ह्मणुनी आपण निकट वसे ॥ स्त्री सुत धन मम अपुल्या सच्चित्सुखपदिं लावितसे ॥ प्राणसख्या विसराया शांताराम समर्थ नसे ॥ १ ॥

**२१ पद** ( तमाशा अजब गारुडीका, या चा० )

जरिं हा भेदमुळीं नसता ॥ विषयानंदब्रह्म होता ॥ ध्रु० ॥ अखिल विषय हे नाशवंत ही ठाम कल्पना सकळां ॥ अनादि ब्रह्मचि अनंत त्यातें कैंच्या त्या नाशकला ॥१॥ त्रिपुटी मीरवे विषयमंडपीं ब्रम्हि तिज न शिरकाव ॥ ब्रह्मानंदीं विकार नसती ज्यानां विषयचि ठाव ॥ २ ॥ विषयानंदा प्रमाण बाधे तैसा गुण परिणाम ॥ अप्रमाण निर्गुण तें ब्रह्म चिरशांतीचें धाम ॥ ३ ॥ चढे योग्यता विषयानंदा दुःखा पासुनि जाणा ॥ पर प्रकाशक ब्रह्म दाविण्या शांताराम शकेना ॥ ४ ॥

**२२ पद** ( श्रीगुरुचे चरणकंज, या चा० )

सदा श्री हरिचें नाम मुखीं गात जारे ॥ वर्णाश्रम विहित कर्म करणें हा प्रथम धर्म निरहंकृति कंजनयन ध्यात जारे ॥ १ ॥ सत्संगें शास्त्र श्रवण श्रवणाचें करुनि मनन निदिध्यासें पूर्ण सुखी रहात जारे ॥ २ ॥ निरतिशये निजानंद हाचि अहर्निशिछंद अंतरंगि तोचि जगीं पहात जारे ॥ ॥ ३ ॥

**२३. पद** ( तमाशा अजब गारुडीका, या चा० )

मजला भजतिल जे कोणी आणिन त्यां आत्मस्थानीं ॥ ध्रु० ॥ सद्भक्तीनें जे जे पूजिती अहंकार सांडुनियां ॥ हृदयीं त्यांच्या अखंड राहिन स्मरणें येईन ठाया ॥ १ ॥ ज्यानें अपुलें सुमन अर्पिलें सोडिन उन्मन करुनी ॥ अंतःकरणीं ठाव मिळाल्या बैसेन दृढ

धरुनी ॥ २ ॥ प्रातःकाळीं धरी नेम जो दत्त दत्त नामाचा ॥ निरिच्छ करुनी लाभचि देइन त्या माझ्या भेटीचा ॥३॥ उपासना विधियुक्त करूनी गुरु वचनीं विश्वास ॥ ठेउनि अपुलें जीवित अर्पी तो भक्त मम श्वास ॥ ४ ॥ धन सुत दारा निजदेहासह पंच प्राणहि वाही ॥ मुक्त होउनी शांतारामचि ठेविल मज निज गेहीं ॥ ५ ॥

२४ पद ( रामा तूं माझा यजमान, या चा० )

चिन्हें दाविति हरिचे पाय ॥ निजभक्तां भय काय ॥ ध्रु० ॥ वज्र भवासुर शत्रा-गारीं, जय सुचवुनि ध्वज ठाय ॥ १ ॥ मन गज अंकुश नियमें वारी, मग सन्मार्गें जाय ॥ २ ॥ ठाकुरदास निजपद पद्मीं, गुंजारव गुण गाय ॥ ३ ॥

२५ पद ( सुवर्णकेतकी परि० या चा० )

दाविलिकांती सुवर्ण केतकी परी प्रभूनें अंगाची ॥ स्वस्तिकासनीं बसुनि दर्शवी यति वेशें अत्यंत सुची ॥ रुद्राक्षांच्या माळा कंठीं छाटी भगव्या रंगाची ॥ भस्म चर्चित रूप दाविलें कींव धरुनि या दासाची ॥ दिव्यतेज पाहूनि जाहली सार्थकता मम जन्माची या श्रीदत्तस्वरुपीं बसली मिठि शांत आरामाची ॥ १ ॥

२६ पद ( तमाशा अजब गारुडीका, या चा० )

लाधे भाग्य जरी ऐसें ब्रह्मानंदा कोण पुसे ॥ ध्रु० ॥ हस्त लागले दत्त पूजनीं बळें न तेथुनि सुटती, चरण प्रदक्षिणि दत्तगुरुपदीं लवे शीर सुप्रीति ॥ १ ॥ तीर्थ सेवनीं जिव्हा लुब्धचि गुण गण श्रवणीं कर्ण, प्रसादवासीं घ्राण गुंतले दर्शन नेत्रां जाण ॥ २ ॥ त्वचा तुष्टली प्रभु सानिध्यें तनु साष्टांग नमुनी, नामोच्चारीं रंगलि वाणी प्राण तसे गुरु-चरणीं ॥ ३ ॥ मनें बुडविलें नाम आपुलें लपलें कोठें न दिसे, दत्तरुपाविण वास नसावा वासनेसि हेंचि पिसें ॥ ४ ॥ सर्व थैव तें ज्ञान सूटलें संसारीं अज्ञाना, आत्मचिंतनीं जीव-गुंगला शीव सदा दूहिना ॥ ५ ॥ अहंब्रह्म हा अंतीचा भ्रम बसे जागच्या जागीं, शांता-रामा अनन्य मुक्ती श्री दत्तपदा जोगी ॥ ६ ॥

२७ पद ( चाल सदर )

अतां अह्मां भय कैचें भय कैचें, अवघें त्रिभुवन दत्ताचें ॥ ध्रु० ॥ त्रिकर्म अमुचें संस्कारासह हरिलें श्रीगुरुराजें ॥ दारा धन सुत निज सेवेसी लावियेलें चरण रजें ॥ १ ॥ सद्भक्तांचीं सुमनें हरिलीं विश्वंभर रूपानें ॥ अभक्तनेत्रां विश्वभासवुनि गुंगवि विषयध्यानें ॥ २ ॥ व्रतें दैवतें तीर्थें सकळचि वागवि आपुल्या पायीं ॥ स्वयें राहुनी सद्भक्तगृहीं चित्सा-म्राज्या देई ॥ ३ ॥ उरों न देई मीपण कैंचा ठाव ह्मणाया माझें ॥ अहंब्रह्म भ्रम श्रीदत्तकृपे शांतारामा लाजे ॥ ४ ॥

२८ पद. ( जरि हा भेद मुळीं नसता, या चा० )

त्यासी जन्म मरणरे नाहीं नाहीं स्वप्नी रे ॥ ध्रु० ॥ आपणा शोधुनी अंतरीं स्वात्मरुपीं, जो ठेला ॥ सर्वांभूतीं एकाकार ब्रह्मांडीं तो भरला ॥ १ ॥ स्वरुपीं अखंड चिन्मय वृत्ति विषय विरक्ती ज्यातें । कर्म ज्ञान तत्पदत्वंपद तुच्छित भासे ज्यातें ॥ २ ॥ माया मृगजळवत् मानुनियां ब्रह्मानंदीं निमाला । ब्रह्मानंदीं शिवरामप्रभू सहज प्राप्त झाला ॥३॥

**२९ पद** ( पंचतुंडनररुंडमालधर, या चा० )

श्री दत्ताचे चरण दाविले त्वांमजला माते ॥ कृतार्थ होउनि तव गुण गातों कुलदेवी शांते ॥ ध्रु० ॥ आदिशक्ति तव नाम तयांतचि अनादित्व ठरतें, मातेहुनि परदैवत नाहीं त्रिजगज्जननि तुतें ॥ विसरुनि शांताराम न जाईचिद्रूप स्थितितें ॥ १ ॥

**३० पद** ( चाल सदर )

कैवल्यपुरीं शांतादुर्गा नांदतसे मम कुळ देवी ॥ स्थानकृपेचें जी मज देई प्रेम सांखळी नित्य नवी ॥ ध्रु० ॥ जनकक्ष्यी नित्य दाविते निज कुमरा माता साध्वी, श्रीदत्तात्रय ब्रह्म सनातन निधान मजला ओळखवी ॥ स्वरूपीं मिळण्या आदिशक्तिची लाधे पूर्ण मदत बरवी, शांतारामा कर्म ज्ञानीं खटपट व्यर्थ कशास हवी ॥ १ ॥

**३१ पद.** ( अशिही भक्ती, या चा० )

आमुचा दसरा ना आह्मां आणिक दुसरा ॥ भक्ति नवविध शांति दहावी ॥ वस्ति पुरे या इंद्रिय गांवीं ॥ ब्रह्मांडावरि स्वारि करावी ॥ हित विस्तारा ॥ ना आह्मां-आणिक दुसरा ॥ १ ॥ द्वैत नसे मग सीमा कवणा ॥ उल्लंघन शीणचिकां उसना ॥ शमीं सुवर्णी एक भावना ॥ स्वानंद खरा ॥ ना आह्मां आणिक दुसरा ॥ २ ॥ विशेष जय शान्ती दशमीचा ॥ जीवन्मुक्तां मुहूर्तसाचा ॥ शांतारामा दत्त पदाचा ॥ अनुभव कोरा ॥ ना आम्हां आणिक दुसरा ॥ ३ ॥

**३२ पद** ( जमका अजब तडाका बे, या चा० )

पापी मज सम ना कोणी संगति नधरावी सुजनी ॥ ध्रु० ॥ माया जननी सवें संग रात्रंदिन हा घडतो ॥ मोह मद्य प्राशनें होउनी धुंद पहा बडबडतो ॥ १ ॥ शरीर शुद्धिहि नाहीं मजला दृष्टी आंतचि फिरली ॥ दुर्गंधीमज न कळे केवळ मौन्यें बोबडी वळली ॥ २ ॥ जें दिसतें तें अनित्य वाटे ना दिसतें तें नित्य ॥ टेकायास्तव जें जें धरितों तें दत्तरूप सत्य ॥ ३ ॥ त्रिभुवन धनश्रीदत्त चोरुनी अंतर्गृहिं ठेवियलें सद्भक्तांनीं अपुल्यापाशीं मुद्यासह मज धरिलें ॥ ४ ॥ अहंब्रह्म या भ्रमामारितां ब्राह्मण हत्या घडली ॥ पंच महा पातकें साधुनीं कामाची राख झाली ॥ ५ ॥ जिवंत असुनी मृत-सम झालों होतें तें घालविलें ॥ स्त्री पुत्रांशी शांतारामें संसारीं ठकवीलें. ॥ ६ ॥

**३३ पद** ( राग बेहाग )

श्रीदत्ता तूं माझा जीवाधार ॥ तुजसम नाहीं अन्य उदार ॥ ध्रु० ॥ संचित् सकळ हरुनी मजला, त्वां केला नादार ॥ १ ॥ दिधला त्वां प्रारब्धा पुरता मज आचार विचार ॥ २ ॥ शांतारामा तव पदीं झालें उघडें मोक्षद्वार ॥ ३ ॥

**३४ पद** ( सुवर्ण केमकी, या चा० )

धान्य अपारचि घरांत होतें परि मजला नव्हतें ठावें ॥ भर बाजारीं भीक मागिली पसा भरी तरि मज द्यावें ॥ ध्रु० ॥ खोल भुयारीं ठेवियलेसे कीं तें कधीं न बरडावें, स्वयें होउनी तृप्त त्या परी इतर भुकेले सुखवावे ॥ १ ॥ उपजे जितुकें आपो-आपचि तितुकें स्वार्थास्तव खावें, तितुकें शतपट वाढे तैं म्यां परहित काजास्तव द्यावें

॥ २ ॥ अनादिकाळीं आहे भरिलें जरित भासे नित्य नवें, शांतारामें दत्तकृपेचें ज्ञान धान्य जगीं वांटावें ॥ ३ ॥

### ३५ पद. ( राग रामकली. ताल दादरा. )

हा ब्रह्मविणा वाजविण्या त्रिभुवनि मनमोहनस्वर नायक दत्ताविण मी प्रार्थुं दुज्या कवणा ॥ ध्रु० ॥ तनु शांतारामाची घोडी सच्चित्कळेचि, मुक्तितारा बांधण्यासि अहंकार सांधा आवश्यक तो जाणा ॥ १ ॥ निर्गुण तसि सगुण भक्ति तारा जोडचि साजति, पंचमि विज्ञान सुवैराग्य घोरिं ठीक बसुनि वाजती तनाना ॥ २ ॥ ज्ञानें-द्रिय कर्मेंद्रिय पंचकेंचि जोडासी, बुद्धि खुंटि पंचमि मन घोरीं बहु शोभतसे नाद ब्रह्म-राणा ॥ ३ ॥ प्रेमाचे मणि वर्तुळ झारा सद्भाव विमळ, सृष्टि स्थिति प्रळयकाळ कारण इच्छाचि मूळ ती गवसणि संधिविना ॥ ४ ॥

### ३६ पद. ( जीवदशेचा महान्यास जो, या चा० )

त्रिशूळ माझे होते मजला जाचक बहुसाल ॥ श्री दत्तानें त्रिशूल मारुनि केलें निर्मूळ ॥ध्रु०॥ जेथें तेथें वैर साधण्या मुळ मस्तक शूल ॥ तृष्णा द्रव्यापहार इच्छा कारण पोटशुळ विषय भोगिं कधिं तृप्ति न होऊंदेई कटिशूल ॥ एकाहुनि हे एक दांडगे बसले प्रतिकूल ॥ चाल ॥ मारिला प्रभूनें त्रिशूल एकसरा ॥ भक्तीचा कांटा मस्तकिं शिरला बरा ॥ ज्ञाना-चा उदरीं कटिं वैराग्यचि पुरा ॥ पूर्वचाल ॥ व्रणांत भरिलें करुनी माझें अहंकारकज्जल ॥ दे स्मृति शांतारामालावुनि नयनि सुदर्शनजल ॥ १ ॥

### ३७ पद ( टप्याच्या चालीवर )

त्रिभुवनिंया जीवाहूनी तुमची गरज मजला ॥ अजि तुमची ॥ ध्रु० ॥ पातकि मज सम कधिंही न मिळे उद्धारायाला ॥ अजि तुमची ॥ १ ॥ दत्तकृपाघन नाम जसें मज अनुभवद्या तसला ॥ अजि तुमची ॥ २ ॥ भर्जित बीजा परि मज ठेवा दैव भोग उरला ॥ अजि तुमची ॥ ४ ॥

### ३८ पद ( मलिन वस्त्र परिधान० या चा० )

बहुपुण्यें मी श्रीदत्ताचा सेवक होतांक्षणीं ॥ साचा ॥ तया प्रसादें करुनि सोडिलें सर्व थैव मजऋणी ॥ क्रियमाणासह संचित ओझें शिरिंचें घे उतरुनीं ॥ दत्तगुरु ॥ प्राक्तन भोगास्तव मज ठेवी केवळ निर्जिव पणीं ॥ अशा मजकडे कशास पहावें याउ-परीं सज्जनीं ॥ सांगा ॥ जाऊं या शांतारामा एकांत काळ कंठुनी ॥ १ ॥

### ३९ पद ( परिणिलें नमुनि कन्येला, या चा० )

चित्कृपा वायु तव आला, संसार उबारा गेला ॥ सद्गुरो ॥ दर्शनीं जीवें घाबरला, या चोरां कंपचि सुटला ॥ सद्गुरो ॥ मम देह चतुष्टय खटला, ॥ नकळे कोठें तो लपला ॥ सद्गुरो ॥ चाल ॥ अंतरीं ठाव दृढ धरीं ॥ जर्जरचि करीं अहंकाराला ॥ भोगि न शांतारामाला ॥ सद्गुरो ॥ १ ॥

**४० पद** ( श्रीदत्ता मी तुझ्या कृपेनें तर चरणीं रंगलों, या चा० )

मर्म दावुनी स्वधर्म कर्मी वर्तविणारा मला ॥ सद्‌गुरू दत्तराज लाधला ।। ध्रु ० ।। मरोनि उरणें अपणा पहाणें भाग्य असें दुर्बळा ॥ याया समर्थ हा शोभला ॥ जडांत चिद्‌रुप चैतन्यीं जड अपूर्व ऐसा लळा ।। लावी परि त्याहुनि वेगळा ।। चाल ।। हा विश्वजननिचा बापखरा मूळचा ॥ मग झाला भर्ता शिवरूपें तो तिचा ॥ पूर्व चाल ।। जन्म घेउनी शांतारामीं बालक साजे तिला ।। सद्‌गुरूदत्तराज लाधला ॥ १ ॥

**४१ पद** ( श्रीदत्तात्रय पंचाक्षरि० या चा० )

दीन दयाळा अनाथ नाथा भक्तवत्सला दत्तगुरो ।। देई मजला अभयवरा कीं, हें मन तुज कधिंहि न विसरो ॥ ध्रु० ।। याच देहिं मम त्रिकर्म अवघें सुखें तुझ्या चरणांत मुरो । भृंग जसा काष्टा तैसा सद्विवेक मजसा फोल करो । नकापरि सुविराग धरुनि मज ब्रह्मसागरामधिं उतरो ॥ अंतर्बाह्य जलस्वरूपी गारेसम शांताराम विरो ।। १ ।।

**४२ पद** ( श्री दत्तपदीं सतत स्मरण, या चा० )

दत्तपदाचा भासचि अंतीं उद्धरील आह्मांस ।। ऐसा दृढविश्वास धरुनि सोडा संसारीं आस ।। ध्रु० ।। सुख भोगानें खास होतसे पुण्याचा तो ऱ्हास ॥ दुःखाचा जरि डांस वाटतो परि पापाचा नास ।। १ ।। क्षणिक देउनी सुवास झोंबिति सकळ विषय अंगास । हरूनिया उल्हास घालिती चौऱ्यांयशीचे फांस ॥ २ ।। विश्वाचा आभास उपजवी ही द्वैताची रास ।। शांतारामीं उदास नसतां दत्त भरे त्रिजगास ।। ३ ॥

**४३ पद** ( श्री गुरुदत्त देखिला काय, या चा० )

ऐसा येइल सुदिन कधीं कोणि तरी सांगा हो ।। ध्रु० ।। चौदेहांतिल मम अभिमान ॥ मी माझें हें अनुसंधान दृढ जें बसलें व्दैत ज्ञान ॥ कंटाळून मज त्यजिती ॥ १ ।। अणुपासाव नभा पर्यंत ॥ दत्त दिसे एक मूर्तिमंत ॥ स्वयेंचि शांताराम अनंत होत संत ब्रम्हवनीं ।। २ ॥

**४४ पद** ( श्री दत्तात्रय पंचाक्षरि, या चा० )

गुण दोषांचें मिश्रण नसतां, एकहि वस्तु न जगिं भेटे ॥ दत्त स्वरूपा वांचुनि निर्गुण निर्मळ अन्य न मज वाटे ॥ ध्रु० ॥ गुण घेउमियां दोष सोडणें न संभवेचि कदापि कुठें ।। यां दोघांचें असे सख्य त्यजितां एक दुजाहि उठे ॥ ज्ञान दृष्टिनें पहातां दोघां यांचें स्वरूप व्दैत तुटे ॥ श्रीगुरुपद प्रसादें शांतारामाचा भ्रम सहज फिटे ॥ १ ॥

**४५ पद** ( शारदेदास० या चा० )

संसार, तरविण्यापार, असे ऊदार, पहा श्रीदत ।। या त्रैलोक्यामधिं कर्णधार प्रख्यात ॥ १ ॥ पदनाव देउनी ठाव, एक सद्भाव, उतारा घेई ॥ जलबिंदु स्पर्शही कधीं न होऊं देई ॥ २ ॥ स्वानुभव, घेउनी सर्व, सुखानें गांव, पावले भक्त ॥ शांताराम अतां या नावेतुनियां जात ॥ ३ ॥

**४६ पद** ( श्री दत्ता मी तुझ्या कृपेनें, या चा० )

लक्ष देउनी साक्ष पाहुंया दक्षपणें धांवतो । असा रथ कसा संभवेचि तो ॥ ध्रु० ॥ निवृत्तीचा कठिण मार्ग वरि रूळ सरळ दीसती, अंतर सम धरुनी वागती ॥ निर्गुण सगुणचि रूळ दोन हे जोंवरि ना हालती, रथासी तोंवरि कैसी भिती ॥ चाल ॥ या परी असे हा मार्ग जगीं बांधिला । रथ चाले वरुनी परोपकारी भला ॥ पूर्वचाल ॥ मधेंचि रथ जरि मार्गा सोडी निजनाशा पावतो । सवें इतरांतें विध्वंसितो ॥ १ ॥ उभारला रथ नर देहाचा पंचभूतिं साजरा । जणूं विधिचातुर्याचा तुरा ॥ प्राणपंच होउनियां यंत्रें भक्तिजलाचा झरा, आणि हा विज्ञानाचा बरा ॥ चाल ॥ वैराग्य यष्टिनें अहंकार कोळशा ॥ जाळतां महा बंबाळ भरे दशदिशा ॥ पूर्वचाल ॥ शीळ वाजउनि शब्दोघाचा दत्त रथीं वळवितो । बुद्धि त्या आकस्मित दान तो ॥ २ ॥ कठिण मार्ग परि मृदु झालासे काय नवल हें बरें । पाहुनि सुवेग नजर न ठरे । तधीं हसुनियां जाई मार्गे धूर रुपानें त्वरें । जें मन भल्या भल्या नावरे ॥ चाल ॥ सोहं सोहं हा ध्वनि प्रतिध्वनी निघे । तैं वाटे रथ हा ब्रम्हनभीं जणु रिघे ॥ पूर्वचाल ॥ योग भोग त्यागाचीं स्थानें दत्त रथीं दावितो । शांतारामा न विसंबितो ॥ ३ ॥

**४७ पद** ( तमाशा अजब गारुडीका, या चा० )

प्रभुची हीच खरी माया, नेई भुलवुनि सर्व लया ॥ध्रु०॥ अंधा हृदयीं उपजे इच्छा ग्रंथ सदा वाचावे । डोळसासि वाटे कीं निशिदिनि बिछान्यांत लोळावें ॥ १ ॥ बहिऱ्या लागे ओढ कीर्तनीं इतरांतें कंटाळा । ब्राम्हण ते बेताल जहाले शूद्र वाजविती टाळा ॥२॥ व्रतबंधाच्या पूर्वीं इच्छा होत असाया संध्या । नंतर देती सोडचिठी तिस वरण्या स्वयें उपाध्या ॥ ३ ॥ शूद्र मस्तकीं केश पाहुनीं वाटे द्विजा असावे । बाळ देउनीं पतिपाशीं पत्निनें नाटका जावें ॥ ४ ॥ वर्णसंकरीं मोठी प्रीती अभक्ष अपेय ईष्ट । वेशेचा मळ अमृत वाटे सदा पत्निवरि रुष्ट ॥ ५ ॥ अपहाराचें धन सांठवुनी पुत्र पोषणीं ठेवी । वडिलोपार्जित धन निष्कारण व्यसना मार्गे लावी ॥ ६ ॥ देव सोडुनी शवांत निष्ठा धरणें हा अभिमान । शांतारामा दुःसह होण्या श्रीदत्तदयापूर्ण ॥ ७ ॥

**४८ पद** ( श्रीदत्ता मी तुझ्या कृपेनें, या चा० )

श्रीदत्तानें दिवा लाविला प्रकाश अंबरीं भरे । पहाना मनुजा बहु आदरें ॥ ध्रु० ॥ निजकृपेंच पात्र तैल तें सद्भक्तीचें बरें । पेटण्या ज्ञानाग्नी संगरे ॥ जीव दशेची वात पेटती विषयवायु आवरे । झांकण वैराग्याचें खरें ॥ चाल ॥ न कळे यां पैकीं प्रथम काय सरलें । परि पात्रीं पहातां काजळ नच लागलें ॥ पूर्वचाल ॥ अपूर्वता कीं दिवा विझाल्या प्रकाश केविं न सरे । शांतारामहि अवघा मुरे ॥ १ ॥

**४९ पद** ( अंतःकरणीं ठसा उमटला, या चा० )

अत्रि मुनीचा सुत झालासी ब्रम्हसनातन श्रीदत्ता ॥ अनसूयेचें भाग्य उदेलें पाहुनि त्रिजगीं तव सत्ता ॥ ध्रु० ॥ योगामाजी जखडुनि गेले दिसेल त्यां सन्मार्ग अतां ॥

विषय विषानें तप्त जहाले त्यांचा दाह शमे परता ॥ वैराग्य मदें अंधचि बनले मिळे नयां अंजन ताता ॥ शांतारामा कृपा कटाक्षें देसी निजरूपीं ममता ॥ १ ॥

**५० पद** ( स्मरतां नित्य हरी, या चा० )

त्रिजगापाशीं करणें काय तारक श्रीदत्ताचे पाय ॥ ध्रु० ॥ माझें ह्मणतां संग उलट मज, बांधुनि ह्मणवी हाय ॥ १ ॥ संग त्यजाया इच्छा धरितां, तीही मारी घाय ॥ २ ॥ घाय भराया उपाय पहातां, दिसती सर्व अपाय ॥ ३ ॥ उपाय तैसे अपाय करण्या समर्थ सद्‌गुरू माय ॥ ४ ॥

**५१ पद** ( नित्य निरंजन निराकार जो, या चा० )

अमोल नरतनु मिळतां प्राण्या मातेरें करिसी ॥ वहान्या गंगेमाजी हात धुवुनि कां न घेसी ॥ ध्रु० ॥ नाना विषयां पासुनि मन हें कां न परतविसी ॥ अधिष्ठान गुरुदत्त पदातें कां सतत न धरिसी ॥ १ ॥ पुण्य गांठिचें खर्चुनि कैसें दुष्कृत जमवीसी ॥ माझें ह्मणसी ओझें होइल न कळे कधि तुसीं ॥ बाइल पोरें देह तुझा हा लुब्ध निज मुखासी । विषय हुंगतां श्वानासम तूं मृत्यु मुखीं पडसी ॥ ३ ॥ मनास चिंता देहास चिता काळ सकळ ग्रासी ॥ नित्य दत्त नामानें होतो नाश अहंकृतिसी ॥ ४ ॥ एक अहंकृति गेल्या मुरते स्थिति रूपासरसी ॥ व्यापुनि उरतें चिद्रुप शांत आराम नभासी ॥५॥

**५२ पद** ( अंतःकरणीं ठसा उमटला, या चा० )

खुशाल बापा कर्म करीं पण कर्मामध्यें गुंतुं नको ॥ करुनि अकर्ता आहे ऐसी फुशारकी कधिं मारुं नको ॥ ध्रु० ॥ कर्मा वांचुनि राहिन ह्मणसी हें स्वप्नीं पण आणुं नको ॥ प्रभुनें पार्थ हृदयिं पेरियलें त्याविण दुसरें सेवुं नको ॥ कायिक वाचिक कर्म मानसिक बरें कि वाइट ठेवुं नको ॥ श्रीदत्तपदीं अर्पुनि शांत आरामाविण पाहुं नको ॥३॥

**५३ पद** ( सुविहित जहालें, या चा० )

गुरुराज चरणीं ।। मनुजारे ॥ गुरुराज चरणिं अर्पुनी सुमन विनवुनियां कांरे कांरे हित न साधिसि ॥ ध्रु० ॥ नरतनु ऐसी संधि दवडुनी लिंग देह तुज श्रमविं नधि रडसि ॥ १ ॥ फलसंगाविण कर्म अचरुनी दत्तनाम निशिदिनि कां न उच्चारिसि ॥ २ ॥ ब्रह्मसुखाचा अनुभव येतां विषय सर्व विषवत सहज त्यजिसि ॥ ३ ॥ शांतारामा दत्तपदाचा ध्यास खास तारक अंत समयासी ॥ ४ ॥

**५४ पद** ( अंतःकरणीं ठसा उमटला. या चा० )

सर्वचि कांहीं करीतसें परि कर्तव्य मसीं बाधेना ॥ जीवाचाही साक्षी मी परि साक्षीपण मज राहीना ॥ ध्रु० ॥ कंटक पायीं रुतला न निघे तो दुसऱ्या कंटकाविना ॥ दोन्ही कांटे त्यजणें जैसें त्यापरि कर्म साक्षिपणा ॥ १ ॥ मलीन भांडें शुद्ध न होई जैसें तें मृत्तिकेविना ॥ मळ जाउनि मृत्तिका रहावी कदापि कोणी इच्छीना ॥ २ ॥ सत्वगुणाचें सत्व निघालें ॥ प्रेमास्पदर्ता उपासना ॥ श्री दत्तात्रय शांतारामा अलिप्त करण्या विसरेना ॥ ३ ॥

**५५ पद** ( श्रीदत्तात्रय पंचाक्षरि संन्मत्र, या चा० )

अमल बसला पूर्ण कलीचा न्यायें ठावचि सोडियला ॥ अन्यायें तो बळकावूनी ओस पाडिलें जगताला ॥ ध्रु० ॥ क्षेत्र शिवाचें ताबा त्याचा बळें जीव आंतचि शिरला ॥ बाहेर घालावया पाहतां चालू वहिवाटीं बसला ॥ दगा करूनी उलटचि जीवें फौजदारि दावा आणिला ॥ अविवेकी मामलेदार हा अन्यायाचा जणु पुतळा ॥ फितुर होउनी बोले दावा योग्य दिवाणी कचेरिला ॥ न्याय शिराणी पूर्ण पहाया मार्ग दिवाणी दावि भला । अहंकार न्यायाधिश अंध वागवि जीवाचा वशिला ॥ खोट्या साक्षी खऱ्या मानितो जीवा हर्षचि बहु झाला ॥ षड्रिपु मोठे साक्षी येउनि वाहति नाना शपथांला ॥ ह्मणति क्षेत्र हें ठाम जिवाचें यांत आह्मां शिवनच दिसला ॥ न्यायाधिश तें ह्मणे मलाही वाटे मालक क्षेत्राला ॥ जीव मूळचा असुनि शिवानें उगाच दंगा मांडियला ॥ अन्यायाचा अनुभव येतां यापरि शांतारामाला ॥ क्षेत्र सोडुनी देणें पडलें मिळणें श्रीगुरुदत्ताला ॥ १ ॥

**५६ पद** ( तमाशा अजब गारुडीका, या चा० )

पापें एकवट मनिं आणा ॥ शांताराम जीव जाणा ॥ ध्रु० ॥ सकळ दुःखिता विश्रांतिस्तव एक ठाव सांपडला ॥ संपूर्णचि व्यसनानीं याला निज कैवारी केला ॥ १ ॥ मुख्य मुख्य जे अघोर असती संस्कार मुळीं खोटे । त्यांतें मदत कराया झटती । देती प्राणहि वांटे ॥ २ ॥ चौऱ्यांशींचा फेरा त्यासी जणु हक्काचें स्थान । नर देहीं त्या चैन पडेना भासे निंद्यचि पूर्ण ॥ ३ ॥ अशा खटांची मिठी कशाला भेटि करी अपाया ॥ नमन करावें त्यांतें दुरुनी पडूं न द्यावी छाया ॥ ४ ॥ श्रीदत्तात्रय पद नौकेमधिं एकांतीं त्या जागा । अपुल्या सह द्या तरुं तया परि दावुं नका अनुरागा ॥ ५ ॥

**५७ पद** ( नित्यनिरंजन निराकार जो, या चा० )

कविता माझी पाहुनि भुलणें मजला हें तों अज्ञान ॥ अर्थ जया श्रीदत्तपादाचा त्यासी भुलणें हे ज्ञान ॥ध्रु०॥ धेनू वर्णन त्यजुनी वदणें पात्राचें ते महिमान ॥ जिव्हेची रुची न शिणिनि चित्तीं वाखाणिति अति पक्वान्न ॥ १ ॥ क्षीर उपेक्षुनी पागोट्याची करिती नानाविध जतन ॥ काव्यांतिल सुविचार सोडुनी चालीवर बहु जाय मन ॥ २ ॥ सकळ साधनें सदार्थ धरणें याहुनि न दुजें सुर्खरण ॥ दमार्थ लाउनि शांतारामा मिळवीणें श्री गुरुचरण ॥ ३ ॥

**५८ पद** ( श्री दत्त चरणि गोडी, या चा० )

कानन आनंदाचें ॥ ठाणें केलें पूर्ण कृपेचें ॥ ध्रु० ॥ शहर मोहमय बहु विषयांचें ॥ पश्चिम मुख हें भक्तसिंधूचें ॥ देह चतुष्टय साचें ॥ बनलें स्थानचि चौपाटीचें ॥ १ ॥ पूर्ण प्रकाशा मुख्य ठिकाण ॥ भेद कळाया तट वेष्टन ॥ निर्मळ अंतःकरण ॥ राहे सन्मुख लिंग शिवाचें ॥२॥ प्रासाद असे ह्या सुमनाचा ॥ सुवास प्रभुच्या सान्निध्याचा ॥ वर्णनें शिणली वाचा ॥ घेई घुटके गुरुभजनाचे ॥३॥ मायादेवी बागांवांची ॥ अपुल्यादासा दत्त पदाची ॥ लावी गोडी मुळची ॥ त्यांसह शांतारामहि नाचे ॥ का० ॥ ४ ॥

## वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध सत्पुरुष

### समाधिस्थ श्रीगुलाबराव महाराज यांजकडे ह. गु. भ. प. बाबागर्दे यांचा कविता रूपानें झालेला पत्रव्यवहार.

**पद** ( चाल–भला जन्म हा तुला लाधला, या चा० )

गुलाबराया तुला बघाया इच्छा होती मनीं । होय ती पूर्ण तुझ्या दर्शनीं ॥ ध्रु० ॥ कीर्ति ऐकुनी मूर्ति रेखिली हृदयीं तव म्यां जशी । हुबेहुब दिसली नयनां तशी ॥ धन्य माय ती अशी विभूती जन्मे जीच्या कुशीं । विरळा भूवरि रत्नें अशीं ॥ चाल ॥ मम बहुत जन्मकृत पुण्योदय जाहला । त्यामुळेंचि हें तव दर्शन झालें मला । ज्ञानेश्वर ममतात असा जो दर्शविशी भाषणीं । वाटे सत्यचि मज तो ध्वनी ॥ गुलाबराया० ॥१॥ तात ह्मणसि तूं अळंदिनाथा तेवीं जो श्रीपती । मानिसी त्यातें माझा पती । हेंहि वावगें दिसे न मजला पाहतां गोपीमती । जडल्या भगवंतीं ज्या अती ॥ चाल ॥ पडे विसर कदाचित् स्वामीचा सेवका । अंकुरही होइल सख्य भक्तिचा सुका । परी क्षणहि पतिविरह न साहे पतिव्रता कामिनी । नच ही प्रीति व्यभिचारिणी ॥ गुलाबराया० ॥ २ ॥ ग्रंथ विमर्शन सज्जन दर्शन छंद हाचि लागला । बहुता दिवसांपासुनि मला । अक्कलकोटस्वामीप्रभृती जो जो यति ऐकिला । तो तो साक्षेपें देखिला ॥चाल॥ कुणि बसे मुक्यापरि खुळ्यावाणि बडबडे। कुणि शैशवलीला दावी लोकांपुढें । अशा विभूती वंद्य होति जरि लोकपापवारणी । * नमिळे मोक्ष तयांपासुनी ॥ गुलाबराया० ॥ ३ ॥ अंध ह्मणति मतिमंद तुला जे अंध तेचि

---

* 'अक्कलकोटस्वामींप्रभृतींच्या दर्शनापासून लोकांचें पाप निवारण होतें, परंतु त्यांपासून मोक्ष मिळत नसतो' असें महानुभव बाबागर्दे यांनीं वरील पद्यांत ह्मटलेलें आहे. मला निश्चयें करून वाटत आहे कीं, ज्या प्राण्यास रात्रंदिवस ज्ञानप्राप्तीचीच तळमळ लागून राहिलेली आहे व एका या विषयावांचून त्याच्या देहांत कोणत्याहि प्रकारच्या अन्य विषयांच्या वृत्तींचा यत्किंचितही वारा स्पर्शत नाहीं, अशी शुद्ध सत्वमय प्रेमळमूर्ति त्या दीव्य विभूतींच्या ( फक्त ज्ञानप्राप्तीच्या इच्छेनें ) दर्शनास गेली असतां ते लगेंच आपल्या अंतर्ज्ञानानें त्याचे मनोरथ जाणून त्यास असा कांहीं एक विलक्षण योगायोग आणून देतात कीं, त्या मनुष्यास त्या प्रसंगीं प्रती ज्ञानेश्वर-महाराजांसारखेच सद्गुरू भेटवून देऊन तद्द्वारा त्याची ज्ञानेच्छेची तळमळ शांत करून देऊन त्यास मोक्षपदाचा अधिकारी करून सोडितात. (श्री एकनाथी भावार्थ रामायणाचें उत्तरकाण्ड श्रीनाथांनीं देह ठेवितेवेळीं त्यांच्या आश्रमांत पुरणपोळ्या खाण्याच्या इच्छेनें राहिलेल्या एका अशिक्षित 'गावबा'नांवाच्या मनुष्याकडून संपूर्ण करविलें आहे हें जगजाहिर आहेच. ) व यावदलचा प्रचीत्यनुभव त्या प्राण्यासच असतो. 'येथें प्रचीत आहे प्रमाण । नलगे शास्त्राचें अनुमान' असें श्रीरामदास ह्मणतात ! व 'ब्रह्मज्ञान नव्हे लेंकरांच्या गोष्टी । तेथें व्हावा पोटीं अनुताप' असें श्रीतुकोबांचे अनुभवोद्गार आहेत! हा वादग्रस्त विषय नव्हेच असें मनाला वाटून प्रसंगानुसार दोन शब्द लिहिले या बद्दल मी म० बाबांची व सर्व संतभक्त बंधुभगिनींची प्रेमानें क्षमा मागत आहें.

तत्वतां । नसती ज्ञानचक्षु ज्यां स्वतां । मुनी जागतो तींत असे जी निशाचि सर्वांभुतां । असें हरि सांगे कुंतीसुता ॥ चाल ॥ निष्णात असे जो शाब्दीं परि तो गुरू । उद्धवासि ऐसें वदे भक्तसुरतरू । अशा लक्षणें युक्त दिसे जो त्याच्या पदवंदनीं । व्हावें तत्पर साधक जनीं ॥ गुलाबराया० ॥ ४ ॥ सर्व शास्त्रिं तव विचित्र पाहुनि शिक्षण रहिता गती । गमसी केवळ शंकरयती । प्राकृत कविना तुझी स्मरविमज खचित अळंदीपती । बापा तव गुण वानूं किती ॥ चाल ॥ वा कृपा असावी तव या दीनावरी । मज करी नुपेक्षा भक्त अडाणी जरी । द्यावी मज शेवटची जागा भक्तिसुधाभोजनीं । प्रार्थी कृष्णसूनु वंदुनी ॥ गुलाबराया० ॥ ५ ॥

## श्रीगुलाबराव महाराज यांजकडून वरील पत्रास गेलेलें उत्तर.

श्लोक शिखरिणी- (कुऱ्हा २४-१-१५)

नमस्ते आचार्य स्वपद पदवी प्रेमवरद । नमस्ते सर्वात्मन् मुरहरसुर स्वर्गपुरद ॥ नमस्ते योऽरातिश्रियमभिनता याप्यघवते । नमस्तेऽलंदीश स्वजनसुखकर्त्रे भगवते ॥ १ ॥ नमो बाबाजीच्या शुभविभवदा पादकमला । परब्रह्मीं शांतीं तनुमतिरती यत्न विमला ॥ विनंती कीं माते प्रभुलिखित तें आज मिळलें । पहातां देवाचें अतिमजवरी प्रेम कळलें ॥ ॥ २ ॥ स्वबाळातें वानी जननि जन ते उत्तम ह्मणे । अभिप्रायें याची स्तुतिपद असें मी गणि मनें ॥ उगा त्या वांचोनी मजपदभवा गौरव कसा । पदींच्या जूतीचा पदिंच दिसतो उत्तम ठसा ॥ ३ ॥ स्तुती आत्म्याचीही तरि सहज सौख्यीं उभयता । स्तुती देहाची तें मजसि उमटे फार भयता ॥ तनू आधींची हे जडमलिन निंद्या सदहिता । बरी शूद्राचीया कुळिं उपजली वेदरहिता ॥ ४ ॥ स्वधर्मे विप्राची मज चरणसेवा न घडली । परंतु दुर्दैवें विपरित कृती मात्र जडली ॥ अशा नीचा मातें निज समजुनी लाड करितां । नहे आश्चर्याचे सरल सुजनीं प्रेमपुरता ॥ ५ ॥ अभावें नेत्रांच्या बहुत करुनी अन्नसलिला । द्विजां देणें लागे हृदयिं अति हें जाचत मला ॥ वृथा वेदांताचें मिष करुनि मी वैभव धरीं । अशा माझी कैसी करिल करुणा कोण उदरीं ॥ ६ ॥ असो या शोकातें वदुनि पुढतीं काय करणें । भवत्पादांभोजा नमुनि बरवें मौन धरणें ॥ व्रजेशप्रेमाचा मधुरतर वाहो हृदिं झरा । अशा आशीर्वादा वदुनि मजला पावन करा ॥ ७ ॥ परब्रह्मज्ञानें जग निखिल हें बाधित गमे । तथापि प्रारब्धें पुढति विषयीं अंतर रमे ॥ तयातें जिंकाया विषय अरपावे हरिपदीं । अहंता ही आटे भजन करितां बोलति सुधी ॥ ८ ॥ दिव्यापासोनीयां समजारें दिवा अन्य उजळे । तरी आधील्याचें प्रथमपण हें कैंच न गळे ॥ कृपे तेवीं ज्याच्या चितिमति वळे त्या न भजुनी । कृतघ्न ज्ञानी तो भव वश सदा चित्समजुनी ॥ ९ ॥ अहो स्वप्नीं मिथ्या जननि आपुली ही जरि दिसे । तदाही सत्पुत्रीं परमपूज्यत्वार्ति उमसे । तसा मिथ्या निश्चीं मधुरमय भेटे गुरु हरी । उपेक्षा तें त्याची पशुविण दुजा कोणि न करी ॥ १० ॥ कळे संधी तेव्हां सुजन हृदयीं खेळत चिती । उठे वृत्ती तेव्हां विषय अवघे चाल करिती । निराकारी संधी सगुणचरणीं वृत्ति जडतां । भवाब्धी आटे हा श्रम बहु निरोधीं न पडतां ॥ ११ ॥ जशी स्वप्नीं मिथ्या युवति तरि कामार्त डुलवी । तसा ज्ञानी

रागी तरि मग तया भ्रांति भुलवी । यशोदाबाळाच्या चरणकमळांवांचुनि कदा । अनंतोपायांनीं तुटति न महा गर्वविपदा ॥ १२ ॥ हिरण्या जाणे त्या नग बघुनियां तोष उपजे । हिरण्या नेणे तो बघुनि भुलतो पित्तलहि जें ॥ तसा ब्रह्मज्ञानी सगुण-भजनें सौख्य मिळवी । विना ज्ञानें ध्याता जयविजयसा चित्त चळवी ॥ १३ ॥ पिता तूं माता तूं बहिण सुत तूं या शतपदीं । बळें अध्यासाच्या सकळ जन होती नत पदीं । तया आचार्यांचें वचन निवटी 'त्वं' ह्मणवुनी । परब्रह्माहंता तददि मनुजाची नच उणी ॥ १४ ॥ गुरूक्ति 'त्वं' बोधें परम सुख शिष्याप्रति मिळे । तदा 'त्वं' पूज्यत्वें उलट जइं त्याची मति वळे । ह्मणातें वाचेच्या तइं मुकुनि घे भक्तिपदवी । स्वयें वाचे साधू हरि वदुनि आनासि वदवी ॥ १५ ॥ गुणाच्या दृष्टीतें जरि निरखितां सांख्यविषयें । तदा मायाबिंबीं यद्-प्रति मिळे सत्वनिचयें । स्थिति ज्ञाना सत्वाविण नच असें तात वदले । तदा कैसी भक्ति त्यजतिल समोपाधि मधले ॥ १६ ॥ समोपाधी झाले तरि वरपणा ये हरिपदा । शुची सत्वाढीतो ह्मणुनि यजिती सज्जन सदा । अदंभादी साधूगुण सहज ज्या रीति उर्वी । तशी ब्रह्मज्ञाच्या मनिं उमटते माधवरती ॥ १७ ॥ श्रमे लाहे बोधा न भजुनि मनीं जो हरहरी । विरागाद्यभ्यासीं षडरिचय त्याची मति हरी ॥ अहंकर्तृत्वेंधी श्रमुनि सुखसंधी न कळवी । हरिप्रेमाकृष्ट प्रतिपद परानंद मिळवी ॥ १८ ॥ परज्ञानें ज्यांचे चिदचिदखिल ग्रंथि सुटले । मुनी तेही प्रेमें व्रजवरचरित्रीं विनटले ॥ कुठें थोरनातो गुरु शुकनृपा भक्तिवदला । उपेक्षूनी देवा किमपि न फिटे वेद बदला ॥ १९ ॥ विदेही साधू तो हरिगुण-सुधा अंतरिं भरी । अनादी साधूंच्या कृति न कधिंही दूषित करी ॥ जना वाटे वेडा परि अधिकृताचा भव हरी । गुरुत्वाच्या इच्छेविण गुरुपणा ज्या प्रति वरी ॥ २० ॥ विदेही होवोनी बहुत तनु सोंगास करिती । दुराचारालागीं बळकटपणें चित्तिं धरिती । श्रुतांत नणोनी विषय फळ जें भोगिति कुडें । यमाजीच्या दंडें मरुनि मग त्यां दुर्गति घडे ॥ ॥ २१ ॥ अरागद्वेषत्वें शिशुसम जरी पंडित असे । यथेच्छा विण्मूत्रादिकरण परी त्या प्रति-नसे ॥ असें सूत्रीं भाष्यीं ह्मणति मुनि आचार्यहि सवे । वृथा चाळे तस्मात शठ करिति तें उत्तम नव्हे ॥ २२ ॥ पिशाचादी वृत्ती न दिसति कुठें वेद गदिता । परी ढोंगी मूर्खा बहुत गमते त्यांत मुदिता ॥ विनाज्ञानाभ्यासें सकल करणीं संसृति फळे । नदंभें कोणाचें करुनि तपही चित्त उजळे ॥ २३ ॥ चमत्कारेच्छूच्या निजमनिं उगा काम उजळे । चमत्कारेच्छूची यवनसुखलाळें तनु मळे ॥ चमत्कारेच्छू तो निगमरहिता धर्म समजे । ह्मणोनी मातें हो रुचति तुमच्या श्रुतिगम जे ॥ २४ ॥ स्वधर्माचारानें हृदय शुचिता जे प्रगटते । उपास्तीनें तेव्हां सहजचि अचांचल्य घटते ॥ परब्रह्मज्ञानें निखिलहि अविद्या मळ झडे । मुकुंदाच्या प्रेमें अभिभवहि देवाप्रति घडे ॥ २५ ॥ समाधीवांचोनी सहज सुख बुद्धाहि न मिळे । हरिप्रेमासक्ता सुखमयचि उत्थानहि फळे । समाधीव्युत्थानें जरि विदित वेद्यास नसती । तरी जीवन्मुक्तीपद निरखितां अंगिं दिसती ॥ २६ ॥ यदप्यश्रुत्यंशा वचनगत सद्बोध हरितो । चिदाभ्यासत्वानेंतदपि मतिविक्षेप उरतो । अहंब्रह्मज्ञानी चरमपद तें चित्तिं धरुनीं । चिदाभासाहंता हरिनि हरि सेवाचि करुनी ॥ २७ ॥

पितामाताबंधुपतिसुत सुमित्रादि भलतें। रमानाथीं नातें जुळवुनि मिळे भक्तिबळ तें। कृतज्ञज्ञा त्यांची हरिस भजणें पूर्विल प्रथा। जनातें ताराया स्फुरति ह्मणुनी मापति कथा ॥ २८ ॥ रसायावच्छक्ती रचुनि भरलीही शिखरिणी। तुह्मां प्रीती पावो मधुररुचि जेवीं शिखरिणी ॥ तुझ्या चित्तीं बाळे अतितर वसो ईश्वररती। अशा आशीर्वादें मज मिळवुनी द्या वजण्ती ॥ २९ ॥ पदीं पोल्हारांच्या रुणुझुणु असा नाद उठतो। करींच्या चक्रान हृदयरिपुचा बंध तुटतो। जना ताराया जो अवतरुनि आलंदित वसे। तया स्वामीपाया नमुनि लिखिना अर्पित असे ॥ ३० ॥ आपला चिरंजीव,

**गुलाब.**

ता० क०-पत्र लाख पुरीवरून फिरत फिरत कुऱ्हेगांव मुक्कामीं मिळालें, करितां उत्तराला उशीर लागला त्याची क्षमा असावी. घाईनें पत्र लिहिलें असल्यामुळें कदाचित् चुकी राहिली असल्यास कळवितील. कृपा प्रसादोत्तर येईल अशी आशा आहे.

---

म० **बाबा गर्दे** यांजकडून पत्रोत्तर.

श्रीहरि गुरुभक्तिपरायण **गुलाबराव महाराज** यांचे चरणसेवेसी--

**श्लोक-पृथिवी.**

प्रसाद तुह्मि धाडिला सदय होवुनि जो मला। धुळ्यांत असतांचि तो सुसमयीं मला पावला। गिरा मधुर तूमची मधुर त्यांतही छंद तो। जया शिखरिणी कवी ह्मणति फारची शोभतो ॥ १ ॥ प्रसन्न तुमची गिरा सुरनदी-प्रवाहा परी। कवित्व-रचना किती सरल जी मनाला हरी। प्रगल्भ उपदेश गर्भित सुनम्रवाणी अशी। करी श्रवण जो रुझे त्वरित भक्ति मन्मानसीं ॥ २ ॥ द्विजावरि बहू दिसे सहज भक्ति जी त्वन्मनीं। दिसे न तसि भूवरी क्वचितही इदानींतनीं। तसा द्विजहि आढळे जगिं न योग्य जो भक्तिला। ह्मणोनि न गमे अहो नवल त्यांत कांहीं मला ॥ ३ ॥ जिथें सुदृढ बोध ठाव न तिथें असे भक्तिला। असाचि बहुधा जगीं नियम दीसतो दृष्टिला ॥ परंतु तुमच्या प्रभो हृदयिं भक्ति जैसी दिसे। तसा सुदृढ बोधही नवल जाहलें हें कसें ॥ ४ ॥ विराग तव देखुनी मम मनीं तुका आठवे। स्वबोध दिधला तुला मजगमें अळंदीधवें ॥ तुझ्या बघुनि भक्तिला झुरति मत्सरें गोपिका। शिरीं धरिन मी अशा पदभवाचिया पादुका ॥ ५ ॥

चरणरज--बाबा गर्दे, मु० मुंबई.

ह. भ. प. बाबा गर्दे यांच्या सदरील पत्रास श्रीगुलाबराव महाराजांकडून गेलेलें उत्तर

**श्लोक-पृथिवी.**

प्रणम्य जगदीश्वरं हृदयशुद्धिकोधीवरं ( निखिललोक हृद्धीवरं-पाठांतर ) अलंदि-मणिमद्वयं भवभयाब्धि नौधीवरं। यदीयचरणाश्रितस्सकलकिल्बिषैर्मुच्यते। तदीय करुणा-लवाल्लिखितमेतदत्रोच्यते ॥ १ ॥ पदास मिळवावया बिसकुमार बाबाजिच्या। पदांबुज-नना नमो मुमुकुमार बाबाजिच्या ॥ सुपत्र तुमचें प्रभो मजसि आज हो पावलें। कवित्व

मुरुयांदपा धरणिवृत्त जें फावलें ॥ २ ॥ तुझ्या हृदयिं गोपिवत्प्रभुरती भवद्दोलणें । जरि स्तव तथापि हा वर ह्मणोनि म्यां डोलणें । परंतु विधिच्या वरें दनुजलेंकुरें मातलीं । तसा न मज गर्व हो अटहि पाहिजे घातली ॥ ३ ॥ विनिंदि मजलाचि जो सहज तुष्टतो काळजी । परि स्तविति जो मला बहु तदीय हो काळजी ॥ विनिंदिक जना ममावगुण सांपडे नेटुनी । परि स्तवितया भल्या सगुण दावुं मी कोटुनी ॥ ४ ॥ सुमाय रिझते सुताप्रतिच घालुनी भूषणें । भवत्कृत सुतस्तवें गुरु तसे तुह्मीं तोषणे ॥ गुणीं रसिं विहीन मी ललित मात्र कोंडावरी । उगाड निजलेंकुरा स्तवुं नयेचि तोंडावरी ॥ ५ ॥ असो घडु भवद्वरें हृदयचित्खतारावली । वृथा श्रुतिपथाविणा नयनचित्खतारावली । न घालि हरिच्या गळां करुनि नाम हारावली । उगे श्रम तदीय ते पढुनि नाम हारावली ॥ ६ ॥ रमापपद आमुचें भिजवि ब्रह्मसारागिरी । अशास मग पाहिल मनिं कशास कारागिरी ॥ जपें न न तपेंहि जो अणुहि गर्विता फावतो । न योग करितां कळे भजकपाठिं तो धांवतो ॥ ७ ॥ जगा पवन मंत्र हा उलट हंस सोहं ध्वनी । तसा सम न जीव हा शिवचि होय सोहं ध्वनी । अहंपण परंतु तें उभय ठायिंचें ना जिरे । ह्मणोनि यदुवल्लभस्मरण सर्वदा साजिरे ॥ ८ ॥ हरिग्रहणयोग्य तें जंव निजात्मसंबोधनीं । मग श्रम उगेचि कां करितसा अहं-रोधनीं ॥ खरें तदपि जागणें अधिक नीजणें मांडुनी । न संचित अहं पहा मतिविशे-षना मांडुनी ॥ ९ ॥ परंतु चपळा मना किमपि भाव हा नाकळे । तरंग उठतां कसा जलधि थांबमा नाकळे । मनस्थित ह्मणोनियां करिति योगि ज्या कारणें । सवृत्तिकहि तारितो मधुर नाम हाकारणें ॥ १० ॥ न वृत्ति उठती कशा सलिल बुद्बुदाचे परी । अशाच वदल्या बहू अवधुतादि सद्वैखरी । खरे परि जलालयीं लहरि दों निमित्तीं घटे । शुभा शशिज आदिमा पवनजा दुजी संघटे ॥ ११ ॥ समुद्र पवनें चढे प्रबल जैं तुफाना-वरी । महाकुशल तेधवां तरणिया नफा नावरी । शशांक जनिता शुभा लहरि सागरीं ऊठती । तदा भयविवर्जितें सहज तारुही सूटती ॥ १२ ॥ अशा हृदयवृत्तिही द्विविध सत्वजा कामजा । शुभा प्रथम दूसऱ्या अशुभ घेतिना सामजा । स्वभावजचि आदिमा ह्मणुनि भक्तियोगीं मुखें । सहाय करिती हरिस्मरण चालतांनां मुखें ॥ १३ ॥ तरंग पव-नोत्थ ते पवनरोधनें नासती । तशा विषयवासना पवनरोधनें नासती । हरीस्मरण मात्र हें उभय कार्य सारें करी । हिरण्य परि घेति हे सुजन आर्य झारे करी ॥ १४ ॥ सकाम करितां श्रम प्रणवमंत्र पारायणीं । तदा न उदये दया हृदयसिद्ध नारायणीं । सुरालय सुरालयीं स्वसुख शेवटीं अल्पना । ह्मणोनि हरि चिंतिजे त्यजुनि पोटिं संकल्पना ॥ १५ ॥ विराग न नरा बरा जगतिं राग जेणें घडे । उपासन न मान्य तें चरण-सारणें ऊघडे । रुचे न चिति चातुरी विषय वासना तर्पणें । ह्मणोनि तनु मानसा दनुजवाशना अर्पणें ॥ १६ ॥ न वागृणविमोचना स्वगुरुरूप शर्वापदा । नमी शठ तया कशा चुकति बोधगर्वा-पदा । न रंग हृदया जया चढत कृष्णसंकीर्तनीं । दिनेशकुमरागृहीं पडत तो महाकर्तनीं ॥ १७ ॥ कुणी यदुपभक्तिनें ह्मणनि योग्य कां आयका । परद्विपमर्धी हिनें विवश होति हो बायका । मिळेल मग देशही रिपु पडोनियां खालते । अशाऽशुचिकुलोद्भवा समयिं मांसही चालतें ॥ १८ ॥ बहुव्रजप भक्तही ह्मणवितात आह्मांमधें । स्वमान मिळवावया

त्यजिति सिद्धसामामदें । त्यजूनि बहु शास्त्र ते महिवरादि आवेशिती । परंतु शतमूर्ख हे बत उगे द्विजां द्वेषिती ॥ १९ ॥ पराशरज बोलिले भजनयोग ज्या लाभला । द्विषड्गुण धरामराहुनि कुजाति तोही भला । न विप्रसम देवता पुढति वाक्य हें फावलें । ह्मणूनि उभयान्वयें भजनसाम्य हो पावलें ॥ २० ॥ समत्व भजनीं असो विषमता असो भोजनीं । समत्व हरिकूजनीं विषमता क्रतूपूजनीं । अपक्व समदानही विषम कांचनाद्यर्पणीं । समत्व चितिदर्पणीं विषमता बरी तर्पणीं ॥ २१ ॥ स्वभक्त्यभिमतिस्तव द्विजविधान नासूं नये । द्विजेंहि परि कर्मठें हरिजनांस हांसूं नये । दरिद्रचिभलें कुणा कधिंहि तोंड वासूं नये । अधर्म करुनीं गळां रविजरज्जु फासूं नये ॥ २२ ॥ न शूद्र निगमें तरे प्रणवकोटि संकल्पुनी । न विप्रहि तरे वृथा यदुपनाम हें जल्पुनी । पुराण हरिभक्ति दे श्रवणयोग्य शूद्रांजनां । स्वभक्तिरसिं मीनता हरिच देत मुद्रा जनां ॥ २३ ॥ बळें द्विजचि होउनी निगम जो वृथा सांडवी । विरक्ति न तया परी यमचि भक्षितो आवडी । स्वकीय अणु सोडुनी परधनार्थ जो धांवतो । वदान्य असला तरी सहज चोरता पावतो ॥ २४ ॥ गुरुद्विजपदांबुजीं मम अखंड वाढो रती । स्वधर्म परि पालनीं निजमना जडो आरती । न स्वप्नगत भोग्यही जननिजोवें पुत्रांदिकां । अधर्म न बरा तसा पठित वेद सूत्रादिकां ॥ २५ ॥ स्वदैववशसन्मुनी बहुत धर्म हो सांडिती । परंतु फळ भोगितां मग न दीनता मांडिती । व्रजेश परबायका हरि ह्मणोनि तद्वायका । बळें हरिति भिन्न हे चरित भारतीं आयका ॥ २६ ॥ पढोनि निगमांतही उगिच धर्म जो वारिता । न पाप चिति मी असे ह्मणुनि त्यास संहारिता । श्रुति स्फुट कळे असा असल आततायी तरी । तयास वधितां ह्मणे स्मृति न दोष ये अंतरीं ॥ २७ ॥ स्वजीव जरि ईश्वरा रचित दृष्टिसृष्ट्यन्वयें । तथापि न तदिच्छया भलतिशीच सृष्ट्यन्वयें । स्वयें अबुध होउनी हरिस देत सर्वज्ञता । स्वपाद हणि त्या अशा कवण दे अपूर्वज्ञता ॥ २८ ॥ कदापि न शके रचूं उलट ईश्वरा जीव हा । वृथाचि मग गर्व कां वचन मात्र निर्भेव हा । वडील यदुवल्लभा समजुनी मनीं जो भजे । तया प्रतिच शोभते निगमवित्त निस्तोभ जें ॥ २९ ॥ उपास्तिसम भक्ति ते ह्मणति तुच्छता वासना । उपास्ति परि अज्ञ घे रुचत भक्ति निर्वासना । उपास्ति निज यत्नजा कृतिसमुच्चिता भावना । गुणश्रवण ज्या घडे सहज भक्ति निर्भावना ॥ ३० ॥ ह्मणे तनु नव्हे विभू सगुण माधवाची अणू । तयास कळली नसे चिति पढोनि वेदां अणू । पुरीततिंत भासते जगनभादि सारें जरी । समाम्य विभुता तदा हरिविषीं नव्हे साजिरी ॥ ३१ ॥ न मध्य न महत्यणू सकल शब्दलक्ष्या चिती । तथापि सुगमा गमे पदविबोधपक्षा चिती । विरुद्ध न तदा कदा सगुण माधवाची तनू । दिसे कनकभूषणीं वपुगुणी तसा चेतनू ॥ ३२ ॥ सुवृत्ति असतां तळीं अगुण जो भला आठवी । स्ववृत्ति उठतांक्षणीं सगुण अंतरीं साठवी । स्वयें अगुण होउनी सगुण चिंतितो सादरें । तदीय चरणांबुजीं भ्रमर चित्त हो आदरें ॥ ३३ ॥ तुह्मां विनविंले प्रभो चरण मस्तकीं घेउनी । यथावचनरूप हें पृथिविदान हो देउनी । प्रसन्न करुं इच्छिते वर गुरो मला पाठवा । अखंड अवतार हा मम मनी असो आठवा ॥ ३४ ॥ अलंदिपति सद्गुरुस्मरणदीप जें पाजळे । तदा चितिविशेषता कळुनि भास हा पां जळे । विशेष चितिसौरसें निखिल हारपे दर्प तो । नमोनि शतदां तया लिखित पाउलीं अर्पितो ॥ ३५ ॥

# मालेच्या आश्रयदात्यांस सप्रेम विनंति.

**श्रीसंतसंघपुस्तकमालेचे** माझे परमप्रिय आश्रयदाते **बंधुभगिनी** हो! आज आपणापुढें भगवत्प्रेरणनें हात जोडून प्रेमपूर्वक विनंति करित आहें कीं, **परमदयाघनदेवा**च्या इच्छेनुरूप या हातून **"स्वकुटुंबउदरसंरक्षणार्थच"** हा पवित्र **मालेचा धंदा** शके १८३४ पासून आज शके १८४१ पर्यंत सुरू झाला. मालेचा पहिला भाग शके १८३४ मध्यें बाहेर पडून दुसरा भाग शके १८३६ मध्यें प्रसिद्ध झाला, व हा तिसरा भाग आज शके १८४१ मध्यें बाहेर पडत आहे. इतक्या दरम्यान तत्संबंधीं ज्या कांहीं मध्यें अनेक अडचणी उद्भवल्या त्याही **श्रीसंतकृपेनें** पार पडून कृतार्थ झालों.

**श्रीसंतसंघपुस्तकमालें**तील **संतां**च्या पूर्ण कृपा आशिर्वादानें माझ्या हिंदुस्थानवासी अत्यंत प्रेमळ **संतभक्तां**ची ओळख त्यांजकडून आलेल्या नानाविध प्रेमपरिप्लुत पत्रव्यवहारद्वारें झाली. त्यां प्रेमळ **भक्तोत्तमा**नीं मला आपल्या शुद्ध प्रेमानें बद्ध करून आपला जन्मभर अंकित करून ठेविल्यानें त्यांच्या प्रेमाचें वर्णन करण्यास व मोबदला देण्यास मी पामर खरोखरींच असमर्थ आहे! दूर दूर प्रदेशीं असलेल्या माझ्या अनेक परम प्रेमळ **संतभक्तां**चें मला प्रत्यक्ष रीतीनें दर्शन घेणें व त्यांच्यांशीं प्रेमोद्गार बोलणें अशक्य असलें तरीं अशा त्या सुहृदय प्रेमळांचे येथें किंचित तरी प्रेमव्यक्त केल्या वांचून माझ्यानें रहावत नाहीं. त्यांच्या त्या प्रेमानें ओथंबलेल्या पत्रव्यवहारावरून हा माझा **मालेचा धंदा** त्यांस मनापासून आवडलेला आहे असें सहज दिसून येतें. या बद्दल माझ्या प्रेमळ हितचिंतकांचे मजवर अनंत उपकार आहेत, व ते मी आजन्म विसरणार नाहीं.

प्रिय आश्रयदातेहो! अमोल असा हा नरदेह अशाश्वत आहे, हें **ईश्वरा**च्या नियमानुसार निश्चित आहेच. त्यावरून हा मालेचा माझा धंदा पुढें सुरळीत चालेल असें मला सांगतां येत नाहीं. सर्व सूत्रें **देवरायाच्याच** हातीं आहेत! **हा देह आहे तों पर्यंत माझ्या परिवाराचें मला निमित्तमात्र संगोपन करणें इष्ट आहेच. अर्थात् ईश्वराची इच्छा झालीच तर ४ भाग बाहेर पाडण्याचा माझा धंदा सुरू होईलच,** आणि तसा योग **प्रभू**नें न आणिलाच तर माझे जिवलग प्रेमळ आश्रयदाते हो आपल्या परमपूज्य चरणकमलांवर हा तुमचा अत्यंत नम्र दास हेच अनंत नमस्कार करीत आहे, ते आपणास सादर होवोत! या पामरास सदैव प्रेम दृष्टीनें पहावा व पूर्ण कृपा ठेवावी ही तुह्मांपाशीं हात जोडून निरंतर याचना करीत आहें!!

हे प्रभो— ओंवी.

**माझी मज होवो जाणीव नेणिव। माझें मजकडूनि वाढो कीर्ति वैभव**
**चतूरशहाणा होवो मी सर्वथैव। स्वहितात्म साधनीं माझिया॥ १॥**

श्लोक.

**तूं सत्य एक तुज सत्य असत्य ठावें। लोभी प्रपंच प्रिय मी मज काय गावें।**
**सत्येश्वरा तुज किती ठकवीन मी रे। तूं रक्षि लाज ह्मणुनी तुज मी नमी रे॥१॥**

॥ भगवान श्रीकृष्णपदार्पणमस्तु. ॥

## To the patrons and supporters of the

# SHRI SANTA-SANCHA PUSTAKA MALA.

### A word of love.



Dear brothers and sisters:—

By divine prompting I beg with folded hands and loving heart to submit that by the will of the gracious God the work of this sacred 'mala' was taken up by me in the A. D. 1912 and continued till 1919 as a "means of living of my family ! The I part of the "mala" was out in 1912 the II part in 1914 and the III part is going out in 1919. Many difficulties arose in this connection in the interim, but I am gratified that they were all got over by the grace of the Saints.

By the grace of the Saints in the "mala" it became possible for me to get acquainted with numerous saintly men of India through correspondence, breathing of noble sentiments and love. These godly men have enslaved me for life with bonds of pure love, which, I am incompetent to discribe or return. Although an actual meeting or a happy conversation of love with these godly friendes, living in different distant places, is impracticable, yet I cannot help making mention of their love. It is evident from their correspondence, fully breathing of love, that the work of the "mala" has deserved their hearty welcome. I am therefore placed under the deepest obligations of these well wishers and shall, for life, not forget their kindness.

Dear patrons and supporters, this invaluable human body is transient under the law of nature. I cannot, therefore, confidently say that my work of the "mala" will smoothly continue further. All the strings of our existance are in the hands of God. So long as I am alive I am willing to minister, nominally though, to the wants of my family. God willing, therefore, my work of the issue of the IV part of the "mala" will commence. But if He wills otherwise, my dear godly benefactors, this humble servant of yours takes this occasion to offer innumerable salutations at your feet and prays for your grace and look of love on him.

*O Lord ! :—*

*Knowing may I not know, may glory and fame flow from me. May I be wise and disceet in striving after self realisation.*

*Thou art the Truth: Truth and untruth are known to thee. Avoricious and worldly am I, how shall I know thee. O Lard of Truth, how can I cheat thee ? My salutations to thee, pray, save me from shame.*

*Dedicated to Shri Bhagavan Krishna.*

# श्रीसंतसंघपुस्तकमालेस आलेले संत, सज्जनांचे कांहीं

# प्रेमोद्गार.

हर्दा ता. १६–२–१९१४.

**श्रीगुलाबराव महाराजः**—"आपल्या ................ हें पाहून आनंद वाटतो. देवसेवेपेक्षां संत सेवा कलियुगांत जास्त आहे, व वेदांतही प्रतीकोपासना सांगितली आहे. या दृष्टीनें आपण जें काम करित आहांत तें फार महत्वाचें आहे."

किर्लोसवाडी, धारवाड ता. २६–४–१९१९.

श्रीह. गु. भ. प. **बाबागर्दे**:—"देखीले बहु चित्रकार जरि म्या कोणी न ऐसा असे । कीं जो स्वार्थ परार्थही करुनियां मोक्षासि साधीतसे ॥ वाटे कौतुक देखुनी परि असा मुंबापुरीं मानव । योजी चित्रकला महत्भजनिं जो मानूनि तें वैभव ॥ १ ॥

नामें कृष्ण थळी कुळी सुत जगन्नाथोदरीं जन्मला । त्याणें सज्जन मुक्तहार रचुनी भक्तांसि जो अर्पिला ॥ येणें पावति साधु दर्शन फला बैसोनियां स्वस्थळीं । आहे पात्र जनाश्रया मज गमे हा कृष्णशर्मा थळी ॥ २ ॥

पाहोनी श्रम घेतले अमित जे यां पुस्तकां कारणें । तैसा लाभहि होय जो अतुल या मालेचिया धारणें ॥ वाटे किंमतही नसे जड जनां यां पुस्तकांची मला । माला सज्जनकंठि साधु मणिची ही राहुं दे निर्मला" ॥ ३ ॥

*Benares city 1-8-1919.*

**Shri Brahmananda Saraswati Swamy**:—"Really your undertaking this extraordinary work in now a days is very worthy and more useful spiritually to the public" etc.

(1) *The Huzur Kamdar of*—

**H. H. Sir Maharaj Sayaji Rao Gaikwar Bahadur, G.C. S. I., Maharaja of Baroda.**– His Highness accepts with thanks your present of "The Shri Sant Sangha" chart. It is well executed and His Highness hopes that your very great pains will meet with an equally warm public support.

(2) **Sir Bhalchandra Krishna, Kt., L. M., J. P., Bombay.**– 'I went through the whole book so full of charming endearment. The Photos of Saints, living as well as otherwise, bless one with the pleasure of personal visit. The whole get-up of the work is beautiful,indeed. Your efforts in this direction elicit our highest commendation. May the Almighty bless you with long life and ripe intellect to carry on your labour of love."

(3) **Dr. M. G. Deshmukh, M. D., Bombay.**– "The sight of your work filled us with delight. You have placed the general public under great obligation by securing and publishing these likenesses of Saints at great cost and trouble. The sight of even one out of so many saintly personages is sufficient to fill the heart with indescribable ecstacy."

(4) **Mr. V. V. Thakur, B. A. Bombay.** We warmly welcome this second Volume of "Shri Sant Sangha Pustak Mala,' affording, as it does ample food for consideration to a thinking mind in various directions.

The great and good Mahipati, whose lenial literary descent our friend can well desire and deserve to covet, could describe Saints, acts only. His more fortunate follower can well afford now in this Twentieth Century to favour us with figures and facts of saints and what is still more, to fill our hearts with their heavenly lay. Souls blest with faith pure and simple may well hug this Volume as their dearest and priceless treasure. Searching souls, wrestling souls and souls seeking humbly the Light will, each and all, let us hope, find their best friends, guides and philosophers in the Volumes of Shri Santa Sangha before us. The second Volume just published shows decided signs of improvement over the first, and we have full confidence that a warm public support will not fail to elicit happier traits from the author in his future labours of love. We wish him every success in his enterprise.

(5) **Mr. V. V. Wagh, Sub-Judge, Karwar.**– "Let me congratulate you for your publication of "The Saints' collections" collected and published under the saints' inspiration indeed. All the likenesses are well printed and the appearance of the whole work is delicate and

pleasant. It is really a very happy incident in one's life to get the sight of various saints blessing different provinces, in one and the same place, and this you have secured and facilitated for the public at large at great cost and perhaps, inconvenience, to self."

(6) **Mr. N. G. Kochak, Pleader, Faltan.**– "This garland of saints," removing, as it does, sin, misery and poverty of every description will turn a materialist's heart in the direction of salvation. The same garland will secure salvation to one in search thereof; and it will bless one with perpetual delight if he is already free from worldly shackles."

(7) **Mr. V. V. Kalyanpurker, Inspecting First Class Sub-Judge, Thana.**– "The get-up of the likenesses is excellent. The words of Saints are full of moral sweetness. You have placed all the seekers after self-realisation under great obligations by your valuable publications in as much as the latter afford an indirect sight of Saints where the direct one is not to be had. Your work deserves patronage at the hands of every seeker after the true light."

## ERRATA.

| PAGE. | RANK. | INCORRECT. | CORRECT |
|---|---|---|---|
| 1 | 15 | metampsycosis. | metempsychosis. |
| 1 | 17 | boundant. | bounden. |
| 1 | 33 | tatse. | táste. |
| 2 | 10 | consumated. | consummated. |
| 4 | 16 | Saiatd | Saint. |
| 4 | 18 | deth. | debt. |
| 4 | 22 | bebt | debt. |
| 4 | 32 | consciencioush. | conscientiously. |
| 7 | 20 | freinds. | friends. |
| 36 | 29 | Tellur. | Nellore. |
| 79 | 24 | ( kamathi ) | ( Telague. ) |
| 80 | 3 | Born 1851 | Born 1862 |

## शुद्धिपत्र.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १८ | ८ | पाह. | पाहे. |
| ५९ | १ | छत्तीस, | पस्तीस. |
| २० | ३ | संघे. | संगें. |
| ३६ | २९ | तेल्लुर. | नेल्लुर. |
| ७९ | ७ | कामाटी. | तेलगु. |
| ८९ | ३५ | प्रत्यज्ञ. | प्रत्यक्ष. |
| ९३ | २ | स्वामीच. | स्वामीचें. |
| ९३ | ४ | जहजांनदें. | सहजानंद. |

॥ श्रीरामसमर्थ ॥

## कोल्हापुर निवासिनी सर्वालंकार युक्त खास-

# मत्कुलदेवी श्रीमहालक्ष्मी.



पद-जगदंबे येइंगे, कुलदेवी येइं गे । भेट दिनासी देई गे ॥ धृ० ॥
त्वत्पदपंकजीं भ्रमरापरि मज । नतवुनि सुखमय नांदवि गे ॥ज० ॥ १ ॥
अद्वय भजनानंद देउनीं । काल सार्थकीं लावीं गे ॥ ज० ॥ २ ॥
मोहपसारा वारुनि सारा । षड्रिपु माझे पळवीं गे ॥ ज० ॥ ३ ॥
मृगजळवत संसार उमजवुनि । स्वानंद सदनीं नेई गे ॥ ज० ॥ ४ ॥
पदर पसरुनी मागत अंबे । विसरुं नको कृष्ण दासा गे ॥ ज० ॥ ५ ॥

॥ श्रीरामसमर्थ. ॥



Your most obedient and humble Brother,

K. J. Thaly.

आपला नम्र बंधु,

कृ. ज. थळी.

Photographer–G. S. Trilokekar. Bombay.

ॐ नमो भगवते वासुदेवाय ।

श्रीकृष्ण नव्हे अवतार ।
हा अवतारी चिन्मात्र ।
सांगे भाव भक्तकथं चरित्र ।
ब्रह्मादि हा नेणती ॥



भक्ति मुक्ति भुक्ति ।
तीन्ही करी एक पंक्ती ।
माय बापं यांची ख्याती ।
ब्राह्मणि मातो विश्वरूप दावी ॥
( ए. भा. )

# श्रीरमावल्लभदास.

हे प्रसिद्ध कृष्णभक्त व संतकवि १६ व्या शतकांत होऊन गेले. यांनीं केलेल्या—

## ‘ श्रीकृष्णजयन्तीव्रतकथा भजन ’

पुस्तकाची सुधारलेली दुसरी आवृत्ति छापून तयार झाली आहे. पुस्तकारंभीं **श्रीदत्ताचें १ व श्रीकृष्णाचीं ८** अशीं हाफटोन प्रोसेसनें तयार केलेलीं **सुंदर ९ चित्रें** असून डेमी अष्टपत्री सांच्याचीं पृष्ठें २०० आहेत. किंमत ट. ख. खेरीज १ रु. ठेविली आहे. ती अगदीं माफक आहे.

यांतील श्रीकृष्णकथेचे रमावल्लभदासांनीं केलेले प्रबंध, पदें वगैरे फारच रसाळ व प्रासादिक असल्यामुळें अत्यंत मोहक आहेत. समर्थ श्रीरामदासांनीं **श्रीरामउपासना**-सांप्रदाय घालून दिला, त्याप्रमाणें श्रीरमावल्लभदासांनीं **श्रीकृष्णउपासना**-सांप्रदाय घालून दिला आहे हे प्रथम देवगिरी गडावर म्लेंच्छराजाच्या पदरीं कारभारी होते. त्या वेळच्या एका लढाईत यांना विजयश्रीनें माळ घातल्यावर शत्रुसैन्याच्या लुटीमध्यें **श्रीएकनाथीभागवत** यांच्या हातीं सांपडलें, आणि हेंच यांच्या आध्यात्मिक भाग्योदयास कारण झालें त्याबद्दलचें सविस्तर वर्णन वरील पुस्तकाच्या प्रस्तावनेंत केलें आहे, तें इतिहास-संशोधकांना व इतर जिज्ञासूंना उपयुक्त व मनोरंजक वाटेल यांत संशय नाहीं. यांच्या चरित्राचें व ग्रंथाचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां **श्रीएकनाथमहाराजांनीं** श्रीकृष्णउपासना सांप्रदाय वाढविण्याकरितां रमावल्लभदासरूपानें दुसरा **अवतार** धारण केला असें वाटल्यावांचून रहात नाहीं.

ह्या सत्पुरुषाचे समग्र ग्रंथ पदें वगैरे शोधून प्रगट करण्याचें काम त्यांच्याच प्रेरणेनें आज पांच वर्षांपासून मी करीत आहें. त्यांनीं केलेल्या ग्रंथांपैकीं ( १ ) ‘ बृहद्वाक्यवृत्तीवरील प्रा. टीका, ’ ( २ ) ‘ प्रबोधचंद्रिका ’ ह्या. श्रीमती आवडीबाईस लिहलेलीं ११ लिखितें ( हें पुस्तक मजकडे मिळेल. किं. २ आणे. ट. ख. नि. ) व ( ३ ) वरील ‘ श्रीकृष्णजयन्तीव्रतकथाभजन ’ पुस्तक याप्रमाणें तीन पुस्तकें श्रीहरिकृपेनें छापून झालीं आहेत. तसेंच—

## श्रीरमावल्लभदास गाथा

या नांवाचें पुस्तक छापण्याकरितां तयार होत आहे. यांत त्यांच्या अप्रकाशित प्रासादिक कवितांचा अमोल संग्रह असून त्याचे नामपर, रूपपर, करुणापर, वैराग्यपर,

ज्ञानपर, उपदेशपर, स्वानुभवपर, संतपर व गुरुमहिमापर असे भाग पाडले आहेत, शिवाय भागवत-दशमनिर्धार, गोपीगीता व रमावल्लभदासमाहिमान (त्यांच्या शिष्यांनीं केलेलें ) असे आणखी विषय आहेत. हे प्रपंचासक्तास भक्त्यभिमुख करणारे, मुमुक्षु-साधकांस अध्यात्माचा साधनमार्ग दर्शविणारे, व सिद्धांस कौतुक उत्पन्न करणारे आहेत. ( रसिक ग्राहकांनीं आगाऊ सह्या पाठवून नांवें नोंदवावीं. त्यांना पाऊणपट सवलतीच्या दरानें पुस्तक मिळेल. ) असो.

भ. गीतेवरील ' चमत्कारी ' नामक टीका मीं मिळविली आहे. परंतु ती प्रत बरीच अशुद्ध असलेमुळें प्रत्यंतरें पाहण्याकरितां आणखी दोन तीन प्रती मिळाल्या पाहि-जेत. तसेंच छापलेल्या ' वाक्यवृत्ति टीका ' ग्रंथांतही बऱ्याच ठिकाणीं संदिग्धपणा असल्यामुळें त्याचीही शुद्ध प्रत मिळाली पाहिजे. शिवाय ' वैष्णवगति ' नामक ग्रंथ त्यांनी केल्याचा उल्लेख राघवदासाच्या ग्रंथांत मिळतो. यासाठीं हाही ग्रंथ मिळाला पाहिजे. त्याचप्रमाणें राघवदासांनीं ' रमावल्लभदास बिरुदावळी ' नामक रमावल्लभ-दासांचा चरित्रग्रंथ लिहिला आहे. ( यापैकीं फक्त पहिला अध्याय मिळाला; तो वाक्य-वृत्ति ग्रंथाच्या आरंभीं छापला आहे. ) ह्या बिरुदावळी ग्रंथाची तर फारच अवश्यकता आहे. हे ग्रंथ व रमावल्लभदासांची इतर कविता; तसेंच त्यांच्याविषयीं त्यांच्या शिष्य मंडळींनीं केलेली कविता कोणाकडे असल्यास त्यांनीं ती कृपाकरून मजकडे पाठवावी, अशी हात जोडून प्रार्थना आहे. पुस्तकाचा जीर्णोद्धार करणें ह्मणजे एखाद्या देवालयाचा जीर्णोद्धार केल्याचें पुण्य संपादणें आहे, ह्याबद्दल सज्जनास सांगणेचें कारण नाहीं. मजकडे वरील लेखी प्रती पाठविण्याचा खर्च देऊन पुस्तक छापून झाल्यानंतर छापी प्रतही त्यांजकडे परत करण्यांत येईल. असो.

आतां श्रीरमावल्लभदासाविषयीं विशेष शोध लावण्यास साह्यभूत अशी जी माहिती मिळाली आहे, ती दिली असतां त्या दिशेनें प्रयत्न करणारास उपयोगी पडेल, या हेतूनें ती खालीं दिली आहे. ह्या माहितीचा उपयोग शोधक मंडळी करून घेऊन आपल्या शोधाचा फायदा मलाही देतील अशी मला उमेद आहे.

**वाक्यवृत्तीच्या टीकेंत श्रीरमावल्लभदासांनीं केलेला उल्लेखः-**

( विलास १०. ) ( ओंव्या ) ... हा दालभ्यपुरीं ( दाभोळ ) उचितीं । केला ग्रंथ लवणाब्धितीरीं ॥ १७४ ॥ तीरीं कृष्णेचे आरंभिला । मग दालभ्येश्वरीं संपविला । सत्पुरुषांसी समर्पिला । श्रीरमावल्लभदासानें ॥ १७५ ॥ पुढें-

( वि ११ ) "जोडला गुरु तोचि जाण । श्रीलक्ष्मीधर नाम सुजाण ॥ तो अवतरला निगम-राणा । आपणास आपण अनुग्रहा ॥ ४० ॥ अनुग्रहास गौतमी तट । दुसरी प्रवरा नदी चोखट ॥ दोहीं संगमीं प्रगट । सिद्धेश्वर महादेव ॥ ४१ ॥ महादेव गुप्त तो प्रगटला । गुरुदेवाजीस भेटला ॥ मग उपदेश करावा वाटला । अर्धोदयीं पर्वकाळीं ॥ ४२ ॥ पर्व-काळीं श्रीगोपाळविद्या । उपासना देतांच सुविद्या ॥ प्रगटली गेली अविद्या । स्फूर्ति होऊं लागली ॥४३॥ लागली संतसंगाची चट । ब्रह्मनिरोपण आवडे चोखट ॥ मग त्रियंबका चालिलों गोदातट । पंचवटी देखिली ॥ ४४ ॥ देखिला तेथें गोपाळ गोसावी । महंत

भेटला सद्भावी ॥ तो ह्मणे ब्रह्म होवोनि ब्रह्मपदें गावीं । श्रीकृष्ण अवताराचीं ॥ ४५ ॥ ... " ऐसे गोपाळ गोसावी बरे । समाधानी भेटले ॥ ४६ ॥ भेटले मग निरोप घेऊन म्लेंच्छ सेवा टाकून देऊन ॥ निस्पृह हरिभक्त होऊन । गोदातीरीं राहिलों ॥ ४७ ॥ राहिलों तंव विश्वासिक । भक्त कृष्ण भेटला सात्विक ॥ श्रीमद्भागवत सटीक । दशम एकादश वाचितां ॥ ४८ ॥ वाचितां दोघांचें दोर्नापण । जाऊनि वाढला बोधघण ॥ तंव देवगिरीस विचक्षण । हरिदास पदें शिकले ॥ ४९ ॥ शिकलें चिमणेंसें मूल बरें । तेणें वेधलीं सकलें प्रेमभरें ॥ उपरी बापु शिष्य एकसरें । पूर्ण भक्त भेटों आला ॥ ५० ॥ आला अनुभवा श्रीकृष्ण तया । मग रासी जाहल्या पदांचिया ॥ उपरी मायालाघवें फिरावया । भक्त कृष्ण दक्षिणे चालिला ॥ ५१ ॥ चालिला आला विराट देशांत । कृष्णावेण्या संगमांत ॥ कित्येक दिवस होता निभ्रांत । मग दालभ्यपुरा ( दाभोळ ) चालिला ॥५२॥चालिला कोंकणामाझारीं । हरिहरेश्वर करूनि विचारीं ॥ राहिला दालभ्यपुरीं मग निर्धारीं । कित्येक भक्त झाले श्रीकृष्णाचे ॥ ५३ ॥ श्रीकृष्णाचे भक्त तयांचे मन । चिंतू लागले श्रीगुरु-आगमन ॥ तंव विराट देशीं करिजिये गमन । तेथें लीलेनें मी आलों ॥५५॥ आलों तेथें श्रीकृष्ण भक्त भेटला । नृसिंह आपाजी विनटला ॥ त्या बंधुद्वयांसी वाढला । प्रेमा अति गुरुचा ॥ ५६ ॥ गुरूचा अनुभव गोविंद वांकडा । जाणे दुसरा मल्हारी संवगडा ॥ त्याचेनियोगें श्रवणीं रोकडा । बहुतांसी सद्भाव लागला ॥ ५७ ॥ लागला तंव सुलक्षण । राघव मित्र भेटला आपण ॥ तो नित्य नैमित्तिकीं दक्ष पण । कर्मफलासी नातळे ॥ ५८ ॥ नातळे विधि निषेधास । परी पाळी लोकसंग्रहास ॥ शिवगुरुभक्त सावकाश । श्रवणाधिकारी मानला मज ॥ ५९ ॥ अपार दासपणाचें प्रेम । टळों नेदी नित्यनेम॥दावी उपासना जेणें यमाचळीं कांपे नामघोषें॥६०॥नामघोषें जग तरे । हें निरोपण ज्याचेनि पसरे ॥ तो उमावल्लभदास त्वरें । शिव शिव म्हणतां शिवरूप ॥ ६१ ॥ रूप होऊनि अरूप आहे । तेथें रमावल्लभदास राहे ॥ जय गोपाळ ह्मणतां पाहे । जाहला स्वयें लाघवी हरि ॥ ६२ ॥ हरि तो मी मी तो हरि । मी तूं नाहीं या उपरी ॥ सखा वेचलाहुनि (?) झडकरी । * सतरागड तेथोनि आला ॥ ६३ ॥ आला तो गुरुभक्त अती । पूर्णानंद अनुग्रहित यती ॥ श्रीकृष्ण अनंत शीघ्रगती । तो आमुचा पूर्ण सोहिरा ॥ ६४ ॥ सोयरा तो प्रेम प्रेमाचा । काया मनें धरी वाचा ॥ श्रवणीं तत्पर बहु साचा । स्वसतीसहितें पै ॥ ६५ ॥ सहित भार्या श्रवण करी । महा वाक्याचा अर्थ धरी ॥ अर्थ मनन जहाला लवकरी । तंव दालभ्यपुरा मी गेलों ॥ ६६ ॥ गेलों तेथें कूर्मदास । भाविक तो चतुर सावकाश॥त्याचेनियोगें विशेष।निरोपण सार चालिलें ॥६७॥

या वाक्यवृत्तींत त्यांनीं कालाचा उल्लेख केला नाहीं. तरी त्यांनीं इतर कांहीं ग्रंथ केले आहेत, त्या बहुतेकांत शक संवत्सर घातलेलें आहे. ' दशक निर्धार ' नांवाची भागवत दशम स्कंधांतील श्रीकृष्ण-जन्माध्यायावर लहान ओंवीबद्ध टीका केली आहे. त्यांत कालाचा व स्थलाचा उल्लेख केला आहे तो असा-

"श्रीमत् शालिवाहन । शतें पंधरावरी पंचावन्न ॥ श्रीमुखसंवत्सर गहन । मास

---

* सतरागड ह्मणजे 'सातारा' किंवा दुसरें कोणतें ठिकाण याचा शोधकांनीं शोध करावा.

प्रवर्तन मार्गशीर्ष ॥ १ ॥ श्रीचतुर्दशी शुद्धपक्ष । श्रीदत्तजयन्ती अलक्ष्य ॥ श्रीबुधवार प्रत्यक्ष । श्रीगुरुलक्ष्य लाभलें ॥ २ ॥ तें टीका निर्धार दशकाची । झाली वदून वाणी श्रीशुकाची ॥ जेथें झाली त्या स्थळाची । नाम्ना पापाची वाट मोडी ॥३॥ कृष्णा ( नदी ) कृष्णातनु साक्षात । वेण्या महेश्वर निभ्रांत ॥ उभय संगमीं जो सुस्नात । तो निश्चांत मुक्ति पावे ॥ ४ ॥ दक्षिण प्रयाग नाम धरी । विराटदेशाभीतरीं ( वांईक्षेत्रीं ) । महाबळेश्वर धौम्य कुसरी । तया उपरी मेरुलिंग ॥ ५ ॥ मेरुलिंगाचे दक्षिण बाहीं । यवतेश्वर जाग्रत पाहीं ॥ सर्वथा पैं करंजिये काहीं । दुरी नाहीं तो ग्राम ॥ ६ ॥ येथें काशीभट्ट अनुष्ठानी । श्रीगोविंदभट्ट भागवत व्याख्यानी ॥ हे बंधुद्वय निराभिमानी । समाधानी गुणग्राही ॥ ७ ॥ ग्राही बोळादिककर ( ? ) व या संगीचे । तत्वानंद पूर्णपद मिळणीचे ॥ शंकर गोविंद मल्हारी जीवीचे । साधु प्रीतीचे आळुके ॥ ८ ॥ आळुके अन्यबंधु द्वय । नृसिंह आपाजी अद्वय ॥ कथा श्रवणीं अति तन्मय । होवोनि निःसंशय हरिभक्त ॥ ९ ॥ या संतां पै चातुर्मासी झाली । 'निर्धारटीका' वाचें आली ॥ एकांतीं वृत्ति श्रवणीं चाली । ग्रंथीं लागली वृत्ति त्याची ॥ १० ॥ साधकाच्या हिताकारणें । श्रीकृष्णें मज बोलविणें ॥ श्रीरमावल्लभदासपणें । ग्रंथ करणें संपूर्ण ॥ ११ ॥

रमावल्लभदासांना कोल्हापुरास श्रीदत्तात्रेयाची भेट झाली याबद्दल राघवदासांनीं श्रीदत्तात्रेयस्तुतीमध्यें असें वर्णन केलें आहे.–

" तुझ्या दर्शनाची जो धरी आस । तया भेटसी नाना वेषें ॥ तुवां रमावल्लभदासांस । कोल्हापुरीं प्रत्यक्ष दिधली भेटी ॥ १ ॥ अखंड एकान्तवासी । निज बोध सांगतां लक्ष्मीसी ॥ तेव्हां रमावल्लभदासांसी । सर्व बैसविसी स्वानंदें ॥ २ ॥

**श्रीरमावल्लभदासांची गुरुपरंपरा**:—श्रीआद्यशंकराचार्य यांच्या परंपरेपैकीं आनंदाश्रमस्वामी, श्रीलक्ष्मीधरदास, श्रीरमावल्लभदास, * अमृतराजयोगी, नरहरीदास, श्रीगंगाधरस्वामी, निजानंद व त्यांचा शिष्य राघवगोसावी इत्यादि.

याप्रमाणें रमावल्लभदास कोठें कोठें गेले होते व त्या त्या वेळीं त्यांस कोण कोण भगवद्भक्त भेटले याचा उल्लेख असलेल्या ओंव्या व त्यांची गुरुपरंपरा सज्जन शोधकांच्या माहितीकरितां दिल्या आहेत. तसेंच यांची समाधि जंजिरासंस्थानपैकीं हरेश्वर येथें असून त्यांनीं जिवंत समाधि घेतली होती, असेंही ऐकण्यांत येतें तेव्हां या गोष्टींचा पूर्णपणें कोणी शोध लावून देतील, तर अत्यंत उपकार होतील. ह्या सत्पुरुषांचे प्रासादिक ग्रंथ पदें वगैरे छापून प्रसिद्ध होऊन भाविक मुमुक्षु जनांस परतीर गांठण्याकरितां तें एक साधन व्हावें, यावांचून माझा यांत दुसरा कोणताही हेतु नाहीं. हें परोपकाराचें व संतसेवेचें कृत्य आहे. तरी प्रत्येक महाराष्ट्रीयानें यथाशक्ति साह्य करावें. अशी हात जोडून प्रार्थना आहे.

संतांचा दासानुदास,

**सुब्राव गोपाळ उभयकर.**

( हल्लींचा पत्ता ) C/o मेसर्स कामत ब्रदर्स, बैलहोंगल. (जि. बेळगांव.)

**Bailhongal,** Dist. **Belgaum.**

George the V P. Press, Girgaon-Bombay.